


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ पुरस्कृत
व प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ३७ । अंक १ । ऑक्टोबर १९८३
किंमत ४ रुपये । वार्षिक वर्गणी ३० रुपये

अध्यक्ष व विश्वस्त
तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी

संपादक
मे. पुं. रेगे

संपादकीय पत्रव्यवहार :
मे. पुं. रेगे,
संपादक, 'नवभारत' मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई-४१२ ८०३ (जि. सातारा)

व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :
श्री. ग. दीक्षित,
व्यवस्थापक, 'नवभारत' मासिक,
द्वारा : दी प्राज्ञ प्रेस, वाई-४१२ ८०३.
( जि. सातारा )

मुखपृष्ठ :
विलास सिंदकर

या नियतकालिकाच्या प्रकाशनार्थ महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाकडून अनुदान मिळाले आहे.

## नवभारत दिवाळी अंक

( नोव्हेंबर-डिसेंबर ८३ जोड-अंक )

**प्रसिद्धी : ऑक्टोबर ८३ अखेर.**

काश्मीर प्रश्न; भ्रष्टाचार; केंद्र-राज्यसंबंध, मंडल आयोग; राष्ट्रीय एकात्मता ह्यांसारख्या राजकीय महत्वाच्या प्रश्नांवरील विचारप्रवर्तक लेख...

आणि त्यांचे लेखक—

तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, मे. पुं. रेगे, वसंतराव नगरकर, सुहास पळशीकर, सुनील आडगावकर, सुनीती पुंगलिया, ना. र. इनामदार, प्रफुल्लकुमार बांदिवडेकर, रा. ग. जाधव इत्यादी.

# नवभारत

ऑक्टोबर १९८३

## अनुक्रम



## लेखक-परिचय


■ **रामचंद्र नारायण दांडेकर** : आंतरराष्ट्रीय कीर्तीचे संस्कृत पंडित आणि भारतविद्यावंत (इंडॉलॉजिस्ट); भांडारकर प्राच्यविद्या संशोधन मंदिराचे संचालक, भांडारकर प्राच्यविद्या संशोधन मंदिर, पुणे—४११ ००४. ■ **त्र्यं. कृ. टोपे** : भूतपूर्व कुलगुरू, मुंबई विद्यापीठ; क्यू ७, प्रथमेश सोसायटी, वीर सावरकर मार्ग, प्रभादेवी, मुंबई—४०० ०२५. ■ **व. त्रिं. चिपळोणकर** : निवृत्त प्राध्यापक, भौतिकी विभाग, इन्स्टिटयूट ऑफ सायन्स, मुंबई; फ्लॅट नं. १०६, अभिनव अपार्टमेंट्स, ९९६ नवी पेठ, पुणे—४११ ००३. ■ **पद्मजा घोरपडे** : हिंदी कथालेखिका व कवयित्री; पुणे येथील सर परशुरामभाऊ कॉलेजात प्राध्यापिका; फ्लॅट नं. १६३ सोमेश्वर कृपा, बोराटे फ्लोअर मिलसमोर, आझादवाडी, कोथरूड, पुणे—४११ ०२९. ■ **रा. ना. चव्हाण** : दलित-मित्र, सामाजिक कार्यकर्ते, सामाजिक चळवळींचे चिकित्सक अभ्यासक व लेखक; १३७८ रविवार पेठ, वाई—४१२ ८०३. ■ **शि. स. अंतरकर** : मुंबई विद्यापीठाच्या पणजी येथील पदव्युत्तर अध्यापन व संशोधन केंद्रात तत्त्वज्ञानाचे प्रपाठक.


* स्व. डॉ. राधाकृष्णन् ह्यांच्या पुण्यतिथीनिमित्त ह्या लेखाचा काही भाग ५ सप्टें. १९८३ रोजी आकाशवाणीच्या सर्व मराठी केंद्रांवरून ध्वनिक्षेपित करण्यात आला. —संपादक

## संपादकीय

### न्याय आणि प्रेम

सामाजिक समता हे एक श्रेष्ठ नैतिक मूल्य आहे यात शंका नाही. हे अमान्य करण्याची आज-तरी कुणाची प्राज्ञा नाही. 'आता आपण सर्वच समाजवादी झालो आहोत' असे एका गर्भश्रीमंत हुजूरपक्षीय पुढाऱ्याने ह्या शतकाच्या प्रारंभी हताश उत्साहाने म्हटले होते. ह्या चालीवर 'आता आपण सारेच समतावादी झालो आहोत' असे म्हणता येईल.

समता हे नैतिक मूल्य आहे; कारण समता न्यायाशी संबंधित आहे. आणि न्याय हे एक मूलभूत नैतिक मूल्य आहे. एखादी उपपत्ती (थिअरी) सत्याच्या निकषावर टिकून राहते की नाही, ह्या प्रश्नावर ज्ञानाच्या क्षेत्रात तिला असलेले महत्त्व पूर्णपणे अवलंबून असते; इतर दृष्टींनी ती कितीही रमणीय भासत असली, संकल्पनांची एक सुरेख वीण तिच्यात रचलेली असली, विश्वाचे एक सुरेख चित्र ती मनापुढे उभे करीत असली, माणसांना प्रेरक, आश्वासक असा संदेश ती देत असली तरी हे सर्व मुद्दे गौण असतात; पुराव्याच्या निकषावर ती टिकते की नाही ह्यालाच काय ते महत्त्व असते. ज्ञानाच्या क्षेत्रात सत्याला जे महत्त्व आहे ते सामाजिक व्यवहाराच्या क्षेत्रात न्यायाला आहे असे अनेकदा म्हण-ण्यात येते. सामाजिक व्यवस्था संस्था, प्रथा इ. इतर अनेक दृष्टींनी इष्ट, मोहक, उपयुक्त इ. असतील; उदा., कला आणि शास्त्रे यांच्या वाढीला त्या अनुकूल असतील किंवा समाजात बळाचा आणि विजि-गीषू वृत्तीचा परिपोष करणाऱ्या असतील किंवा समाजात भौतिक समृद्धी साधणाऱ्या असतील. पण ह्या साऱ्या गोष्टींचे महत्त्व गौण आहे; सामाजिक संस्था, प्रथा आणि व्यवहार जर न्यायाच्या तत्त्वाचे पालन करीत असल्या तरच त्या मान्य होण्याजोग्या असतात असे हे मत आहे.

समतेवर आधारलेली न्यायाची संकल्पना आणि समतावादी न्यायाच्या मूल्याला अनुसरून सामाजिक पुनर्रचन करण्याचा आग्रह– सामाजिक न्यायाचा ध्यास– ह्या आधुनिक गोष्टी आहेत. प्लेटो–ॲरिस्टॉटल यांची सामाजिक न्यायाची संकल्पना ही विषमतेवर आधारलेली होती. माणसे भिन्न प्रकारची असतात, व्यक्ती ज्या प्रकारची असते त्याला अनुसरून तिची कार्ये आणि अधिकार ठरत असतात आणि ह्या कार्यांची आणि अधिकारांची सुसंगत आणि परस्परावलंबी व्यवस्था ज्या समाजात असते तो न्यायी समाज अशी प्लेटोची धारणा होती. मनुस्मृति तर चातुर्वर्ण्याचे प्रतिपादन करते.

समताधिष्ठित न्यायाचा विचार भारतात जातिव्यवस्थेच्या पार्श्वभूमीवर होणे अटळ आहे. पारंपरिक हिंदू समाजव्यवस्था जातीच्या संकल्पनेवर आधारलेली होती, जातिव्यवस्था श्रेष्ठत्व–कनिष्ठत्वाच्या संकल्पनेवर आधारलेली आणि म्हणून विषमतेला मान्यता देणारी होती, म्हणून जोतिबांनी तिच्यावर कडाडून हल्ला केला. तुलनेने मुस्लिम आणि ख्रिस्ती समाज हे मानवी समता मानणारे आहेत अशी त्यांची भलावणही केली; पण पारंपरिक मुस्लिम किंवा ख्रिस्ती समाजव्यवस्था सामाजिक समतेवर कधीही आधारलेली नव्हती. युरोपमधील मध्ययुगीन सरंजामी समाज जन्मजात विषमतेवर आधारलेला होता आणि श्रद्धेने ख्रिस्ती होता. अनेकजण त्याच्याकडे आदर्श ख्रिस्ती समाज म्हणून पाहतात. इस्लामला गुलामगिरी, पुरुषाचे स्त्रीहून असलेले श्रेष्ठत्व मान्य होते. इस्लामपूर्व अरबी समाजात किंवा नंतर इस्लामी बनलेल्या इराणी, तुर्की इ. समाजांत जी पारंपरिक विषमता

अनुक्रमणिका

होती ती इस्लामी समाजव्यवस्थेत टिकून राहिली. आज अनेक कॅथलिक धर्मगुरू क्रांतिकारक बनले आहेत. शोषितांचे लढे लढवायचा त्यांनी चंग बांधला आहे. पण हे आधुनिक वारे आहे. हे ख्रिस्ती वारे नाही. हे धर्मगुरू जीझसच्या चरित्रापासून आणि शिकवणीपासून स्फूर्ती घेत असतीलही. पण हिंदूंनाही आत्मौपम्य बुद्धीच्या मूल्यापासून सामाजिक समतेचे लढे लढण्याची प्रेरणा मिळू शकेल आणि ती त्यांनी घ्यावी.

महाराष्ट्रातील अनेक समाजसुधारकांनी जातिव्यवस्थेविरुद्ध जे आक्षेप घेतले होते ते मूलत: न्यायाच्या भूमिकेवरून घेतले नव्हते. जोतिबांनी जातिव्यवस्थेवर केलेला हल्ला न्यायाच्या दृष्टिकोनातून केला होता. ब्राह्मणांनी विद्या आपल्या हाती राखून ठेवली, इतरांना विद्या नाकारली, म्हणजे स्वतःचा विकास करण्याची समान संधी नाकारली आणि त्यांना अज्ञानी आणि दुबळे करून ठेवले; तेव्हा ही अन्याय्य समाजव्यवस्था नाहीशी करून प्रत्येक व्यक्तीला शिक्षणाची आणि शिक्षणाच्या आधारे स्वतःच्या कर्तृत्वाचा विकास करून त्याची फळे उपभोगण्याची समान संधी देणारी समाजरचना स्थापन केली पाहिजे हे जोतिबांच्या हल्ल्याचे सार होते. पण अव्वल इंग्रजीत इतर अनेकांनी जातिव्यवस्था जी त्याज्य मानली, ती रामकृष्णपंत भांडारकरांनी म्हटल्याप्रमाणे ‘ जातिभेद हा राष्ट्रघटनेच्या आड येत असतो ’ ह्या विचारामुळे. जातिभेदामुळे समाज एकसंध, एकात्म राहत नाही, तो फुटीर बनतो. दादोबा पांडुरंगांच्या शब्दांत “ आपल्या देशातील एक वाईट गोष्ट आहे ती ही की, शस्त्रधारण एकच जात करते; बाकीच्या जाती करीत नाहीत. तसेच ब्राह्मणलोकांना स्वत: राजासारखे सुख असावे ही चिंता; परंतु प्रजेबद्दल काहीच काळजी नसते. त्यामुळे आपला देश परकीय राज्यांच्या हाती गेला... (आपले लोक) धर्माच्या आडकाठीमुळे वाहनात बसून दूर देशांमध्ये जात नाहीत. त्यामुळे इतर देशांतील कलाकौशल्यांची त्यांना माहिती नाही, व त्या देशातील लोक करीत असलेल्या विद्यांमध्ये व कलांमध्ये ते मागे पडले. ” ह्याचा अर्थ असा की, जातिभेदामुळे समाजातील एकोपा नाहीसा होतो, समाज फुटीर व म्हणून दुबळा बनतो; आणि शिवाय ज्या समजुतींवर जातिभेद आधारलेला आहे त्यांच्यामुळे समाज मागासलेला आणि कुंठित बनतो. जातिभेदाचे निर्मूलन केल्याने ज्या प्रकारचा समताधिष्ठित समाज निर्माण होईल तो कितीतरी अधिक समर्थ असा समाज असेल– इंग्लिश समाजासारखा– अशी ही कल्पना होती.

सर्व व्यक्तींना स्वतःच्या कर्तृत्वाचा विकास करण्याची आणि त्याची फळे चाखण्याची समान संधी असली पाहिजे ह्या तत्त्वाचा पुरस्कार जसा न्यायाच्या दृष्टीने करता येईल तसा तो उपयुक्ततेच्या दृष्टीने करता येईल; ह्या तत्त्वाचे इष्ट असे सामाजिक परिणाम घडून येतात म्हणून करता येईल. स्वतःच्या कर्तृत्वाचा विकास करण्याची संधी जर सर्वांना उपलब्ध असेल तर समाजाच्या कर्तृत्वाची एकंदर पातळीच वर जाईल, ज्ञान-विज्ञान, कला-कौशल्ये, उत्पादन, व्यवस्थापन-शासन या सर्वच क्षेत्रांत अधिक जोमाने प्रगती होईल आणि तिची फळे सर्वांनाच लाभतील असा हा युक्तिवाद आहे. गेल्या महायुद्धानंतर ‘ भांडवलशाही ’ देशांत गुणवत्तेच्या निकषावर उच्च शिक्षण सर्व मुलामुलींना उपलब्ध होईल अशी जी व्यवस्था करण्यात आली, तिच्यामागे केवळ सामाजिक न्यायाचे तत्त्व नव्हते. विज्ञान-तंत्रज्ञान ह्या अतिशय स्पर्धात्मक बनलेल्या क्षेत्रात टिकाव धरण्यासाठी समाजात उपलब्ध असलेली सर्व बुद्धिमत्ता जास्तीतजास्त प्रमाणात शिक्षित करणे आवश्यक झाले आहे, हा विचारही तिच्यामागे होता.

आता, ‘ प्रत्येक व्यक्तीला स्वतःच्या कर्तृत्वाचा विकास करण्याची आणि ह्या विकासाची फळे चाखण्याची समान संधी असावी ’ हे जसे समतेचे तत्त्व आहे तसेच ते विषमतेचेही तत्त्व आहे. कारण अशी समान संधी लाभल्यानंतर अधिक बुद्धिमान आणि कष्टाळू असलेल्या व्यक्ती अधिक कर्तृत्ववान बनतील आणि कर्तृत्वाच्या प्रमाणात त्यांची स्थिती इतरांच्या तुलनेने अधिक चांगली असेल. ही



अनुक्रमणिका

विषमता अर्थात जन्मजात भेदावर आधारलेली नसेल, भिन्न व्यक्तींनी सामाजिक कल्याणाला जे भिन्न योगदान केलेले असेल त्याच्याशी संबंधित असेल आणि म्हणून न्याय्य असेल. पण एका प्रकारची विषमता निर्माण करणारे आणि तिचे समर्थन करणारे असे हे तत्त्व आहे.

आता ह्या तत्त्वाविषयी दोन मुद्दे मांडता येतील. एक असा, की हे व्यक्तिकेंद्री तत्त्व आहे. त्याच्यात व्यक्ती आणि तिची परिस्थिती असा सुस्पष्ट भेद अभिप्रेत आहे. व्यक्ती आणि तिच्या निसर्गदत्त शारीरिक व मानसिक प्रवृत्ती–शक्ती एका बाजूला आणि तिची बाह्य परिस्थिती दुसऱ्या बाजूला असा हा भेद आहे. व्यक्तीला आपल्या कर्तृत्वाचा विकास करण्याच्या संधी ज्या मिळत असतात, त्या बाह्य परिस्थितीपासून मिळत असतात आणि विकास होत असतो तो तिच्या नैसर्गिक शक्तींचा होत असतो आणि ह्या शक्तींचा वापर करून तिने कमाविलेले ज्ञान आणि कौशल्ये यांचा होत असतो. व्यक्तींना स्वतःच्या शक्तींचा विकास करण्याच्या संधी उपलब्ध करून देणारी त्यांची बाह्य परिस्थिती शक्य तितकी सारखी असावी आणि मग व्यक्तींच्या नैसर्गिक शक्तींमध्ये जो भेद असेल त्याला अनुसरून त्यांनी साधलेल्या कर्तृत्वांत जो भेद अपरिहार्यपणे पडणार आहे तो न्याय्य म्हणून स्वीकारावा असा ह्या तत्त्वाचा आशय आहे.

दुसरा मुद्दा असा आहे, की व्यक्ती आणि तिची बाह्य परिस्थिती यांच्यांत असा काटेकोर भेद करता येत नाही. सुस्थितीत आणि सुसंस्कृत असलेल्या कुटुंबात वाढणाऱ्या मुलावर बालपणापासून जे अनुकूल संस्कार घडतात, त्याच्या भावनांना, मनोवृत्तींना जे वळण लागते त्याच्या भावी कर्तृत्वाचा पायाच, बऱ्याच प्रमाणात रचला जातो. म्हणजे त्याची बाह्य परिस्थिती बाह्य उरत नाही, ती त्याच्या अंतरंगात प्रवेश करून त्याच्या नैसर्गिक शक्तींशी एकजीव होते आणि त्यांना आकार देते. गरीब, अशिक्षित, असंस्कृत कुटुंबात वाढणाऱ्या मुलाच्या वाट्याला हे लाभ येत नाहीत. अंतर्बाह्य जग कुठे संपते आणि मन कुठे सुरू होते हे सांगता येत नाही. न्यायाशी सुसंगत असलेली विषमता एकदा अस्तित्वात आली की कुटुंबसंस्थेमुळे ती टिकून राहायला आणि दृढ होण्याला मोठेच साहाय्य होते. सुस्थितीत असलेले कुटुंब आपल्या मुलांच्या नैसर्गिक कुवतीची जोपासना करून आपण स्वतः गाठलेली सुस्थिती ही मुले टिकवून धरतील अशा दर्जाची गुणवत्ता त्यांच्या अंगी निर्माण करण्याची जिवापाड धडपड करणार. आणि ह्या प्रयत्नांत त्यांना सर्वसाधारणपणे यश येणार. म्हणजे कुटुंबाच्या भावी पिढीची सुस्थिती न्यायाला धरून असणार. प्रारंभी व्यक्तिव्यक्तींमध्ये असलेली आणि व्यक्तीमधील नैसर्गिक भेदांना अनुसरून असणारी विषमता, हळूहळू सामाजिक थरांमधील विषमता असे रूप धारण करणार. आणि समान संधीच्या तत्त्वाला अनुसरून हे सर्व घडणार. समाजात जर कुटुंबसंस्था असेल तर एकदा समान संधी प्रस्थापित केल्यानंतर दोनती पिढ्यांनंतर खरीखुरी समान संधी उरणार नाही.

मग सामाजिक न्यायाच्या स्थापनेसाठी कुटुंबसंस्था नष्ट करणे योग्य ठरेल अशी भूमिका घेता येईल का ? ज्या समाजात कुटुंबसंस्था नाही अशा समाजात जी माणसे तयार होतील ती कशी असतील ? त्यांच्या वृत्ती, भावना, साध्ये काय असतील ? कुटुंबसंस्था नष्ट करण्याचा कार्यक्रम हाती घेऊन पार पाडणारी, समाजातील सर्व अर्भकांच्या पालनपोषणाची, संगोपनाची व्यवस्था करणारी, कुटुंबसंस्था फिरून निर्माण होऊ नये अशी खबरदारी घेऊन त्यासाठी आवश्यक ते उपाय योजणारी जी माणसे असतील– ह्या माणसांचा जो गट किंवा वर्ग असेल– त्यांना हा अधिकार कोणत्या मार्गाने प्राप्त झालेला असेल ? हा कार्यक्रम पार पाडण्यासाठी ह्या वर्गाच्या अंगी सर्वंकष सत्ता केंद्रित झालेली असणे आवश्यक आहे. अशा समाजात व्यक्तिस्वातंत्र्याचे काय होईल ? व्यक्तीच्या प्रतिष्ठेचे काय होईल ? प्रारंभी समान संधीचे तत्त्व व्यक्तीच्या स्वातंत्र्याशी आणि प्रतिष्ठेशी निगडित होते. व्यक्तीच्या जातीवरून तिची राहणी, तिचा व्यवसाय, तिचा वेष, सर्व काही निश्चित होत असे. जातीच्या तावडीतून व्यक्तीची सुटका करणे योग्य आहे असे आपण मानले ते व्यक्तीला तिचे स्वातंत्र्य प्राप्त करून

अनुक्रमणिका

द्यावे म्हणून. आपण कसे जगावे हे ठरविण्याचे स्वातंत्र्य आणि त्याचा भाग म्हणून आपण कोणता व्यवसाय करावा हे ठरविण्याचे स्वातंत्र्य व्यक्तीला असले पाहिजे. आणि व्यवसाय निवडण्याच्या स्वातंत्र्याची पूर्वतयारी म्हणून शिक्षणाची समान संधी व्यक्तीला असली पाहिजे असा हा युक्तिवाद होता व्यक्तीची जीवनसरणी निश्चित करण्याचा परंपरागत रूढींना पूर्वी जो अधिकार होता तो आपण आता एका वर्गाला बहाल करीत आहोत काय ?

ह्याचा अर्थ असा का की, न्यायाला, समाजात न्याय मूर्त करण्याच्या कृतीला, मर्यादा असतात ? कोणताही आदर्श तंतोतंतपणे व्यवहारात उतरवता येत नाही ह्या अर्थाने मर्यादा नव्हे, तर व्यवहाराच्या अनेक क्षेत्रांत न्याय–अन्यायाचा प्रश्नच बाजूला ठेवणे योग्य असते ह्या अर्थाने. मग न्यायाच्या सार्वभौमत्वाचे काय होते ? आणि व्यवहाराच्या काही क्षेत्रांत योग्य कारणासाठी म्हणून जर आपण अन्याय खपवून घेत राहिलो, तर आपली नैतिक संवेदनशीलताच निबर होणार नाही का ? मग अयोग्य कारणासाठीसुद्धा अन्याय खपवून घेण्याची आपली तयारी होईल ?

हे कूटप्रश्न आहेत. त्यांना सोपी उत्तरे आहेत असे मानणे गैर ठरेल. इसाया बर्लिन यांचे एक मार्मिक विधान, ज्याचा त्यांनी अनेकदा पुनरुच्चार केला आहे, ते असे, की सर्व नैतिक आणि इतर मूल्यांची एक सुसंगत रचना करता येईल आणि ती मानवी जीवनात मूर्त करता येईल, ती मानवी जीवनाच्या परिपूर्णतेची अवस्था असेल असे गृहीतकृत्य अनेक तत्त्ववेत्त्यांच्या सामाजिक विचारात दडलेले असते. दोन मूल्यांमध्ये विरोध असू शकत नाही असा हा विचार आहे. पण त्याचा आधार काय ?

न्याय हे जसे मूल्य आहे तसे प्रेम किंवा बंधुभाव हेही एक मूल्य आहे. प्रेम म्हणजे भावनेचा अधूमनधून येणारा उमाळा नव्हे, तर इतरांशी एकरूपता पावण्याची स्थायी वृत्ती, त्यांच्या हिताविषयीची आत्यंतिक आस्था, आणि तिचा व्यवहारात होणारा आविष्कार (कान्ट ह्याला व्यावहारिक प्रेम म्हणत असे आणि त्याच्यात आणि भावनिक प्रेमात भेद करीत असे. ). ह्या प्रेमाचा आशय ज्याला सुवर्णनियम म्हणतात त्या रूपात मांडता येईल : " इतरांनी तुला जसे वागवावे असे तुला वाटते, असे तू इतरांना वागव, " आता ह्या तत्त्वाकडेसुद्धा स्वार्थी पण विवेकशील व्यक्तींनी एकमेकांशी केलेला करार म्हणून पाहता येईल. माझा स्वार्थ साधताना मला जर अनिर्बंध रीतीने वागता येईल तर ते मला हवेच आहे. पण इतरांनाही हेच स्वातंत्र्य स्वतःसाठी मिळाले तर हवेच असणार ही जाण मला आहे. सर्वांनी एकत्र येऊन स्वतःच्या स्वातंत्र्यावर समान मर्यादा घालाव्या आणि त्यांचे कुणी उल्लंघन केले तर सर्वांनी मिळून त्याला शासन करावे ह्या तडजोडीला मी इतरांसमवेत तयार होतो. सर्वांच्या अनिर्बंध स्वातंत्र्यापेक्षा मी धरून सर्वांचे मर्यादित स्वातंत्र्य माझ्या स्वतःच्या स्वार्थसाधनेला अनुकूल आहे, ही गोष्ट मी ओळखतो आणि स्वीकारतो यात माझी विवेकशीलता सामावलेली असते. इतरांनी माझ्याशी जसे वागावे असे मला वाटते, तसे मी इतरांशी वागतो. ह्याचा अर्थ एवढाच, की माझ्याशी वागताना ह्या समान मर्यादांचे पालन इतरांनी करावे असे मला वाटते. आणि मी ह्याच रीतीने इतरांशी वागतो, त्यांच्याशी वागताना ह्या मर्यादा मी सांभाळतो. हा समंजस असा हिशोब आहे.

पण सुवर्णनियमाचा वेगळा अर्थ वेगळ्या रीतीने लावता येईल. इतरांनी माझ्याशी जिव्हाळ्याने वागावे असे मला वाटते आणि तसे मी इतरांशी वागले पाहिजे. त्यांच्याशी एकरूप होऊन त्यांच्या गरजा ओळखल्या पाहिजेत. त्यांचे खरे हित कशात आहे हे जाणले पाहिजे आणि स्वार्थाचा विचार बाजूला ठेवून ह्या गरजांचे समाधान करण्यासाठी आणि हे हित साधण्यासाठी झटले पाहिजे. असे प्रेम इतरांवर करणे ही स्वाभाविक मानवी प्रवृत्ती असेल. स्वार्थ ही जशी एक स्वाभाविक प्रवृत्ती आहे

तशीच प्रेम हीसुद्धा एक स्वाभाविक प्रवृत्ती, बहुधा अधिक क्षीण असलेलो अशी प्रवृत्ती असेल. किंवा ही प्रवृत्ती एका धार्मिक दर्शनावर आधारलेली असेल. सर्व माणसे एकाच परमेश्वराची लेकरे आहेत किंवा परब्रह्माचे अंश आहेत. म्हणून मी त्यांचा योग्य तो आदर केला पाहिजे आणि हा आदर माझ्या वर्तनातून प्रकट झाला पाहिजे.

आता हे प्रेम न्यायनिरपेक्ष असते. न्यायामध्ये सर्व संबंधित पक्षांविषयोचा हिशोब असतो. प्रेमामध्ये स्वतःविषयीचा हिशोब नसतो. आता आपण अन्यायाचे बळी ठरलो आहोत अशी जाणीव ज्यांना झाली आहे, ते म्हणतील की प्रथम आमचा हिशोब चुकता करा. न्यायाची जागा प्रेम घेऊ शकत नाही. आणि ही गोष्ट खरी आहे. जेथे स्पष्ट अन्याय आहे त्या अन्यायाच्या बळीवर प्रेम करण्याचा अर्थ त्याला प्रथम न्याय मिळेल अशी तजवीज करण्यासाठी झटणे असाच होईल. पण विशिष्ट क्षेत्रात विशिष्ट बाबतीत होत असणारा अन्याय दूर करणे ही एक गोष्ट आहे आणि केवळ न्यायाच्या पायावर सबंध समाजाची सर्वांगीण रचना करणे ही वेगळी गोष्ट आहे. असे आपण करू गेलो तर न्यायाची जागा ज्याप्रमाणे प्रेम घेऊ शकत नाही, त्याप्रमाणे प्रेमाची जागा न्याय घेऊ शकत नाही असे आपल्याला आढळून येईल.

भारतीय जनतेची आजची परिस्थिती ध्यानात घेतली तर न्यायावर आधारलेला भारतीय समाज निर्माण करणे हे एक दूरचे स्वप्न आहे असे म्हणावे लागेल. गरीब आणि गांजलेल्या जनतेचे जे प्रतिनिधी आहेत ते न्यायाची भाषा बोलत आहेत. हे समजण्यासारखे आहे. आम्हाला तुमची दया नको, तुमचे दान नको, आम्हाला आमचे हक्क पाहिजे आहेत, जे आमचे आहे आणि जे आमच्यापासून हिरावून घेण्यात आले आहे ते आम्हाला पाहिजे अशी ही भाषा आहे. ती समजण्यासारखी आहे. कारण स्वतःवर झालेल्या अन्यायाची जाणीव ही स्वतःच्या दडपून टाकण्यात आलेल्या प्रतिष्ठेची जाणीव असते आणि ह्या प्रतिष्ठेच्या पुनःस्थापनेवाचून इतर कोणतीही भरपाई अर्थशून्य वाटते. पण भारतीय जनतेची आजची दुःस्थिती सुधारणे हे आज सुस्थितीत असलेल्या भारतीयांच्या हाती आहे आणि त्यांनी न्यायाचे काटेकोर आणि किचकट हिशोब मांडीत न बसता बंधुत्वाची वृत्ती धारण केली पाहिजे. " ज्यांच्यापाशी अधिक आहे त्यांच्याकडे अधिकासाठी मागणी केली जाईल " हे वचन न्यायाचे गणित मांडीत नाही. ते न्यायापलीकडे जाते. कारण देण्याची बिनहिशोबी वृत्ती हेच त्यांच्याकडे अधिक असते. मागण्याला अंत नसतो; कारण देणारा मुरारी असतो.



अनुक्रमणिका

## साभार पोच

* **बहिष्कार** – (कथासंग्रह)– विश्वास भोसले; प्रकाशक : अध्यक्ष, महाराष्ट्र साहित्य परिषद, ९६/७० बी. डी. डी. आंबेडकर मैदानाजवळ, वरळी, मुंबई ४०००१८; पृ. १२८; किं. २० रु.

* **काही पाने काही फुले**– (ललित आणि वैचारिक लेखसंग्रह) ना. ग. गोरे, कॉन्टिनेन्टल प्रकाशन, विजयानगर, पुणे ३०; १९८३; पृ. १०८; किं. १० रुपये.

* **प्रेमचंद** – अमृत राय, अनु. भा. रा. भागवत, नॅशनल बुक ट्रस्ट इंडिया, ए – ५ ग्रीनपार्क, नवी दिल्ली – १६; १९८३; पृ. ४५ रु. २.५०.

* **ग्रीष्म ऋतूतील स्पर्धा**– राधा एम. खम्बादकोणे' अनुवाद सुनंदा देशपांडे; नॅशनल बुक ट्रस्ट इंडिया, नवी दिल्ली – १६; १९८३; पृ. ३०; किं. रु. २.५०.

* **निवडक पुदुमैपित्तम**– संपादन मी. प. सोमसुंदरम, अनुवाद श्रीकान्त रानडे; नॅशनल बुक ट्रस्ट इंडिया, नवी दिल्ली – १६; १९८३; पृ. ९४; किं. रु. ८.००.

* **आभाळरंग** (कथासंग्रह) – सौ. अंजली ठकार; श्रीविद्या प्रकाशन; १९८३; पृ. २१९; किं. रु. ३७.५०

अनुक्रमणिका

# डॉ. सर्वपल्ली राधाकृष्णन् : माझ्या काही आठवणी

रामचंद्र नारायण दांडेकर

माझ्या विद्याजीवनावर, प्रत्यक्षपणे माझे शिक्षक नसलेल्या अशा तीन व्यक्तींचा फार मोठा प्रभाव पडला आहे. त्या तीन व्यक्ती म्हणजे डॉ. सर्वपल्ली राधाकृष्णन्, भारतरत्न पांडुरंग वामन काणे आणि प्रा. सुनीतिकुमार चतर्जी. निरनिराळचा कारणांनी या तीन व्यक्तींच्या कमीअधिक निकट सहवासाचे भाग्य मला लाभले आहे. तसे पाहिले तर विद्यार्थिदशेत असतानाच, मला आणि माझ्या अनेक सहाध्यायांनाही डॉ. राधाकृष्णन् यांच्याबद्दल आदरयुक्त कुतूहल वाटत असे. डॉ. राधाकृष्णन् यांच्या ' भारतीय तत्त्वज्ञान ' या ग्रंथाचे दोन खंड मी बी. ए. व एम्. ए. या परीक्षांसाठी काळजीपूर्वक अभ्यासिले होतेच; पण त्याशिवाय त्यांचे The Reign of Religion in Contemporary Philosophy, The Hindu View of Life, Kalki or the Future of Civilization, An Idealist View of Life हे ग्रंथही एक प्रकारच्या भक्तियुक्त भावुकतेने वाचले होते. त्यांची दोनतीन व्याख्याने ऐकण्याची संधीही मला त्या वेळी मिळाली होती आणि त्यांच्या लेखणीत व वाणीत दिसून येणाऱ्या ओघ, बुद्धिचापल्य, प्रसाद, गोडवा व डौलदारपणा इत्यादी गुणांनी मी अक्षरशः मोहून गेलो होतो. ' संस्कृती ' ची व्याख्या करताना The soul of culture is the culture of the soul ( आत्म्याची संस्कृती हाच संस्कृतीचा आत्मा होय ) असे ते सहजपणे सांगून जातात. संस्कृतीच्या संदर्भात ' पूर्व ' आणि ' पश्चिम ' असा भेद करावयाचा झाल्यास ते म्हणतात : We might divide in order to distinguish if we did not distingwish in order to divide. ( काही वैशिष्टचे समजून घेण्यापुरता, ' पूर्व ' आणि ' पश्चिम ' असा भेद केला तरी चालेल; पण ' पूर्व ' आणि ' पश्चिम ' यांच्यांत भेद प्रस्थापित करण्यासाठी त्यांची वैशिष्टचे शोधता कामा नये.) भारतीयांच्या सांस्कृतिक सहिष्णुतेसंबंधी Hospitality–elementary good manners –in the matter of spirit (आध्यात्मिक क्षेत्रातील आतिथ्य किंवा प्राथमिक स्वरूपाची सभ्यता) असा वाक्प्रयोग त्यांनी केला आहे. ' Spirit works in matter so that matter may serve the spirit ', ' Whatever their religion the mysties all over the world are spiritual kinsmen ', ' Religion is what one does with one's solitude ' अशी राधाकृष्णन् यांच्या लिखाणात व व्याख्यानात चपखलपणे येणारी कितीतरी सुभाषिते मी त्या वेळी पाठ केली होती.

राधाकृष्णन् यांची व माझी प्रत्यक्ष भेट प्रथम झाली ती १९३३–३४ च्या सुमारास. म्हणजे त्या गोष्टीला आता पन्नास वर्षे झाली. मी त्या वेळी नुकताच फर्ग्युसन कॉलेजमध्ये संस्कृतचा प्राध्यापक म्हणून रुजू झालो होतो. कॉलेजच्या कामाव्यतिरिक्त, मी अनेक इतर गोष्टींत रस घेत असे. उदाहरणार्थ, स्वतःचे वाचन आणि विचार यांचा विकास करावा या हेतूने आम्ही काही मित्र मधूनमधून एकत्र जमत असू. त्या मित्रांपैकी प्रभाकर पाध्ये, पी. एन्. ड्रायव्हर, विठ्ठलराव दीक्षित यांची नावे आजही मला चटकन आठवतात. आमच्यापैकी अनेकजणांवर त्या वेळी बर्ट्रांड रसेल यांच्या लिखाणाचा विशेष प्रभाव पडला होता; म्हणून आम्ही आमच्या मंडळाला गमतीने ' रसेल क्लब ' असे म्हणत असू. त्या सुमारास एकदा, कशासाठी ते मला आज आठवत नाही, डॉ. राधाकृष्णन् पुण्यास आले होते. त्यांच्याशी अनौपचारिक चर्चा करावी व त्यांच्या मार्गदर्शनाचा लाभ घ्यावा असे आम्हाला वाटले. म्हणून ' रसेल क्लब'च्या वतीने तशी विनंती








करण्यासाठी त्यांना भेटावे असे आम्ही ठरविले. अर्थात ते एक प्रकारचे धाष्टर्यच होते. पण नवलाची गोष्ट अशी, की आमची विनंती राधाकृष्णन् यांनी ताबडतोब मान्य केली. आणि मग एका संध्याकाळी सर्व्हंट्स ऑफ इंडिया सोसायटीच्या आवारात दीड-दोन तास आम्ही अगदी मोकळेपणाने त्यांच्याशी गप्पागोष्टी केल्या. त्या वेळी साहजिकपणेच बर्ट्रांड रसेल यांचा अनेकदा नामनिर्देश झाला. त्या संदर्भात राधाकृष्णन् यांनी रसेल यांच्याशी झालेल्या आपल्या भेटीचा वृत्तांत मोठ्या चटकदार पद्धतीने आम्हास सांगितला. ज्ञानाच्या क्षेत्रात श्रेष्ठ स्थान मिळविलेल्या रसेलचे वैयक्तिक व कौटुंबिक जीवन किती असमाधानकारक होते हे त्यांनी आम्हाला सांगितले आणि त्याच्याच अनुषंगाने भारतीय तत्त्वज्ञान आणि पाश्चात्त्य तत्त्वज्ञान यांच्यांतील मूलभूत भेद त्यांनी आपल्या दृष्टीने स्पष्ट करून दाखविला. भारतीय तत्त्वज्ञानात way of thought आणि way of life– तत्त्वचिंतन आणि जीवन– यांच्यांत फारकत केली जात नाही. तत्त्वज्ञान हा एक केवळ बुद्धीचा व्यापार आहे असे भारतीयांनी कधीही मानले नाही, तत्त्वज्ञान जीवनात उतरविण्यासाठी–म्हणजेच तत्त्वज्ञान जगण्यासाठी–त्यांचा नेहमीचा अट्टाहास होता. सत्य केवळ 'जाणणे' येथेच पाश्चात्त्य विचारवंत थांबतात; पण त्याच्या पलीकडे जाऊन सत्य 'पाहणे', जीवनात सत्याचा प्रत्यक्ष अनुभव घेणे– साक्षात्कार घडवून आणणे हे भारतीय तत्त्वज्ञानाचे ध्येय आहे. भारतीय तत्त्वज्ञानाला 'दर्शन' असे म्हणतात ते यासाठीच ! रसेलसारख्यांना आध्यात्मिक शांती प्राप्त झाली नाही याचे कारण दोन तत्त्वज्ञानांमधील याच मूलभूत भेदात शोधावे लागेल, असे मत डॉ. राधाकृष्णन् यांनी त्या वेळी प्रदर्शित केले.

त्यानंतर जवळजवळ दहा वर्षांनी, म्हणजे १९४३ साली, डॉ. राधाकृष्णन् यांच्या भेटीचा सुयोग पुन्हा मला प्राप्त झाला. मध्यंतरीच्या काळात जर्मनीस जाऊन तेथील संशोधनप्रधान अभ्यासक्रम मी पूर्ण केला होता. आणि भारतात परत आल्यावर भांडारकर प्राच्यविद्या संशोधन–मंदिराचा प्रमुख कार्यवाह म्हणून मी निवडून आलो होतो. १९४२ साली भांडारकर इन्स्टिटयूट स्थापन होऊन पंचवीस वर्षे पूर्ण झाली. त्यानिमित्त, त्या वेळच्या जागतिक– आणि विशेषत: भारतातील– अस्थिर राजकीय परिस्थितीतही, संस्थेचा रौप्य-महोत्सव, साधेपणानेच पण एखाद्या संशोधनसंस्थेस शोभेल अशा रीतीने, साजरा करावयाचे आम्ही ठरविले. समारंभाचे अध्यक्ष म्हणून एकच नाव माझ्या डोळ्यांपुढे होते, आणि ते म्हणजे राधाकृष्णन् यांचे. त्या वेळी ते बनारस हिंदू युनिव्हर्सिटीचे कुलगुरू होते. डॉ. राधाकृष्णन् यांना संस्थेबद्दल व तेथे काम करीत असलेल्या संशोधकांबद्दल फार आपुलकी वाटत असे. अर्थातच, त्यांनी आमचे निमंत्रण आनंदाने स्वीकारले. ४ जानेवारी १९४३ या दिवशी भांडारकर इन्स्टिटयूटचा रौप्यमहोत्सव डॉ. राधाकृष्णन् यांच्या अध्यक्षतेखाली साजरा झाला. रौप्य महोत्सवाच्या निमित्ताने त्या वेळी मी दोन मोठे ग्रंथ संपादित केले होते– एक Silver Jubilee Volume व दुसरा Progress of Indic Studies. जवळजवळ ७०० पृष्ठांच्या पहिल्या ग्रंथात भारतीय आणि पाश्चात्त्य विद्वानांकडून मुद्दाम लिहून घेतलेले संशोधनपर लेख संगृहीत केले होते. Progress of Indic Studies या दुसऱ्या ग्रंथात १९१७ ते १९४२ या २५ वर्षांच्या कालावधीत संस्कृत विद्या व भारतीय विद्या (Indology) यांसंबंधी जगात झालेल्या सर्व महत्त्वाच्या संशोधनांचे चिकित्सक सर्वेक्षण समाविष्ट करण्यात आले होते. हे दोन ग्रंथ औपचारिकरीत्या प्रकाशित करताना डॉ. राधाकृष्णन् यांनी त्याबद्दल– विशेषत: Progress of Indic Studies या ग्रंथाबद्दल– गौरवोद्गार काढले आणि त्यामुळे त्या वेळी मला मोठी धन्यता वाटली. रौप्य-महोत्सवाचे दुसरे अंग म्हणजे आम्ही भरविलेली Conference of Indologists. परंतु त्या सर्व समारंभाचे प्रमुख आकर्षण होते राधाकृष्णन् यांचे अध्यक्षीय भाषण. त्यांनी आपल्या भाषणाच्या सुरवातीसच, त्या वेळी चालू असलेल्या युद्धाच्या संदर्भात सांगितलेली एक गोष्ट मला अद्यापि चांगली आठवते. पहिल्या महायुद्धाच्या वेळी ऑक्सफर्ड विद्यापीठातील एका विद्वान प्राध्यापकास विचारण्यात आले की, धोक्यात आलेल्या मानवी संस्कृतीचे परिरक्षण करण्यासाठी, इंग्लंडचे जर्मनीशी युद्ध चालू असताना, रणक्षेत्रावर न जाता, तुम्ही येथे काय









करता आहात ? तेव्हा तो प्राध्यापक म्हणाला : "I am the Civilization for which the war is being fought." राधाकृष्णन् यांच्या भाषणातील केन्द्रीभूत विचार होता–Knowledge must become power, radiance, illumination. तेजस्वी नौ अधीतमस्तु. भारतातील संकरात्मक परिस्थितीकडे स्थितप्रज्ञ दृष्टीने पाहणारा आणि जागतिक परिस्थितीत बदल घडवून आणण्यास असमर्थ असणारा मूक भारतीय अध्यात्मवाद आता यापुढे चालणार नाही. अज्ञान व जडता यांतून निर्माण होणारे बाधक प्रतिबंध आणि अभिनिवेशी प्राधिकार प्रस्थापित हितसंबंध यांतून निर्माण होणारे शक्तिशाली प्रतिबंध– असे दोन्ही प्रतिबंध आपण निग्रहाने बाजूस सारले पाहिजेत, आणि स्वार्थीपणा गिळून टाकणाऱ्या व बंधने नष्ट करणाऱ्या अध्यात्मावरील आणि मानवी समतेवरील जाज्वल्य श्रद्धेचा संदेश, स्वतःच्या कृतीने, जगाच्या कानाकोपऱ्यांत पोचविला पाहिजे. उन्नत विचार आणि मोहक वक्तृत्वशैली यांनी परिप्लुत अशा भाषणाची एक चमचमीत मेजवानीच त्या दिवशी पुण्यातील विद्याप्रेमी जनतेला मिळाली.

त्या संध्याकाळी अनुभवलेला एक प्रसंग मला नेहमी आठवतो. राधाकृष्णन् यांचे भाषण चालू असताना, मध्येच ५–६ मिनिटे वीज गेली आणि प्रकाश व ध्वनिप्रसारणयंत्रणा बंद पडली. पण राधाकृष्णन् यांच्या वाग्गंगेत सुस्नात होत असलेल्या श्रोतृवर्गास तो अंतराय मुळीसुद्धा जाणवला नाही.

दुसऱ्या महायुद्धामुळे खंडित झालेले आंतरराष्ट्रीय प्राच्यविद्या–परिषदेचे अधिवेशन १० वर्षांच्या कालावधीनंतर १९४८ साली पॅरिस येथे आयोजित करण्यात आले होते. आपला देश नुकताच स्वतंत्र झाला होता; त्यामुळे स्वतंत्र भारतातर्फे एक अधिकृत प्रतिनिधिमंडळ त्या अधिवेशनास पाठविण्याचे निश्चित करण्यात आले. त्या प्रतिनिधिमंडळात भारत–प्रशासनाचे प्रतिनिधी म्हणून डॉ. राधाकृष्णन् (ते त्यावेळी ऑक्सफर्ड येथे Spalding Professor of Comparative Religions होते), म. म. काणे व सुनीतिकुमार चतर्जी यांचा आणि अखिल भारतीय प्राच्यविद्या–परिषदेचा प्रतिनिधी म्हणून माझा समावेश करण्यात आला होता. स्वतंत्र भारताचे प्रतिनिधी म्हणून आमच्यांत एक नवीनच साभिमान आत्मविश्वास निर्माण झाला होता ! अधिवेशनाचे औपचारिक उद्घाटन होण्यापूर्वी थोडाच वेळ राहिला असता पॅरिसचे मला पूर्वपरिचित असलेले प्रा. ज्यूल ब्लोक माझ्याकडे आले आणि मला म्हणाले : आजच्या उद्घाटनाच्या समारंभात स्वतंत्र भारतातर्फे कोणीतरी भाषण करावे अशी आमच्या कार्यकारिणीची इच्छा आहे; तरी कृपया तशी व्यवस्था करा. आमच्या दृष्टीने हे 'कोणी तरी' म्हणजे डॉ. राधाकृष्णन्च असू शकणार होते. भारतीय तत्त्वज्ञानाची ओळख पाश्चात्त्य अभ्यासकांना, पाश्चात्त्य तत्त्वज्ञानाच्या परिभाषेत आणि प्रतिपादनाच्या ओघात वेळोवेळी भारतीय तत्त्वज्ञान व पाश्चात्त्य तत्त्वज्ञान यांमधील साम्यभेद विशद करून, देणारा प्रतिभाशाली व प्रेरक भाष्यकार म्हणून राधाकृष्णन् हे आंतरराष्ट्रीय विद्वन्मंडळास अगोदरच सुपरिचित झाले होते. परंतु केवळ पारंपरिक भारतीय तत्त्वज्ञानाचा भाष्यकार म्हणून त्यांचे कार्यक्षेत्र सीमित नव्हते; तर स्वतंत्र प्रज्ञेचा व नवीन विचार देऊ शकणारा तत्त्वचिंतक म्हणूनही त्यांना मान्यता प्राप्त झाली होती. उद्घाटनसमारंभात आपण भारतातर्फे भाषण करावे ही पॅरीस येथील कार्यकर्त्यांची विनंती मी त्यांच्या कानावर घातली. ती त्यांनी मान्य केली व ते मला म्हणाले : Let me meditate for five minutes. (मला ५ मिनिटे चिंतन करू द्या) आणि, नंतर जेव्हा त्यांनी भाषण केले, तेव्हा श्रोतृवर्गास त्यांनी एका उच्च अशा वातावरणात नेऊन ठेवले. आधीच्या व्यावहारिक स्वरूपाच्या भाषणांच्या पृष्ठभूमीवर तर ही गोष्ट लक्षणीय रीत्या प्रत्ययास आली. आपल्या नेहमीच्या प्रसंगोचित पद्धतीने राधाकृष्णन् यांनी आपल्या भाषणाच्या प्रारंभीच विख्यात फ्रेंच लेखक अनातोल फ्रांस याचे एक वचन उद्धृत करून, त्याला आपल्या आयुष्यातील खडतर प्रसंगी गौतम बुद्धाच्या शिकवणीपासून कशी मानसिक शांती प्राप्त झाली हे सांगितले. 'अखिल जगातील मानवांच्या परस्परसंबंधांचे नव्याने समायोजन करण्याच्या कुठल्याही प्रकल्पासाठी कशाची आवश्यकता असेल तर ती बुद्धाच्या 'प्रज्ञा' आणि 'करुणा' (Comprehension of compassion, Knowledge of

well-doing) यांविषयीच्या शिकवणीचीच ! केवळ आर्थिक व राजकीय नियोजन हे निष्फळ ठरते, याचा अनुभव आपणास दिवसानुदिवस प्रकर्षाने येत आहेच. बुद्धाचा 'प्रज्ञा' व 'करुणा' हा संदेश, Indology चे Orientology ला योगदान म्हणून मी आज तुम्हांस सादर करीत आहे'– असे म्हणून राधाकृष्णन् यांनी आपले छोटेसेच पण अत्यंत प्रभावी भाषण संपविले.

१९५२ साली राधाकृष्णन् भारताचे उपराष्ट्रपती म्हणून निवडून आले. आणि त्यानंतर पहिली १० वर्षे उपराष्ट्रपती आणि पुढील ५ वर्षे राष्ट्रपती या नात्याने त्यांचा मुक्काम दिल्लीस होता. तुम्ही जेव्हा जेव्हा दिल्लीस याल तेव्हा, कुठल्याही प्रकारचा संकोच न बाळगता मला भेटत जा, संस्कृत आणि इंडॉलॉजीच्या क्षेत्रांत निरनिराळ्या देशांत काय महत्त्वाचे संशोधन–प्रकाशन–कार्य होत आहे याची माहिती मला देत जा, असे मला त्यांचे सांगणे होते. Progress of Indic Studies हा ग्रंथ संपादित केल्यापासून मी त्या विषयावरील डॉ. राधाकृष्णन् यांचा जणू काही खास बातमीदार झालो होतो. दुर्दैवाने त्यांच्या या उदार निमंत्रणाचा लाभ मी फारच थोडचा वेळा घेऊ शकलो. इतस्ततः पसरलेल्या पुस्तकांच्या दाटीत ते आपल्या बिछान्यात रेलून बसले आहेत; जवळच त्यांचा खाजगी चिटणीस नुकत्याच आलेल्या पत्रांचा गठ्ठा घेऊन बसला आहे; आणि एकीकडे त्या गठ्ठ्यातील एकेक पत्र पाहून त्याला काय उत्तर द्यावयाचे हे चिटणीसाला सांगत असतानाच, दुसरीकडे 'ब्रह्मन्' या शब्दाविषयी रनू, होंडा व थीमे या विद्वानांनी नुकतेच जे निरनिराळे विचार पुढे मांडले आहेत त्यांविषयी माझ्याशी बोलणे चालू आहे. त्यांच्या कामाची आणि आपल्या अंतरंगातील परिचितांना भेटण्याची हीच नेहमीची शैली होती. जेव्हा जेव्हा मी त्यांना दिल्ली येथे भेटलो, तेव्हा तेव्हा मला हाच अनुभव आला आहे. त्यांचा कामाचा उरक दांडगा होता. आपण बनारस हिंदू युनिव्हर्सिटीचे कुलगुरू असताना विद्यापीठाच्या Executive Council ची सभा दोन-तीन तासांपेक्षा जास्त वेळ कधीच चालली नाही असे ते मला सांगत असत. पुढे मी स्वतः त्या विद्यापीठाच्या Executive Council चा सदस्य झालो तेव्हा आमच्या सभा दोन-दोन दिवस चालत असत !

भांडारकर इन्स्टिटयूटमध्ये दरवर्षी ऋषिपंचमीच्या दिवशी रामकृष्ण भांडारकर यांची पुण्यतिथी साजरी केली जाते. १९५२ साली डॉ. राधाकृष्णन् उपराष्ट्रपती झाल्यावर त्याच वर्षी ऋषिपंचमीच्या समारंभाचे अध्यक्ष म्हणून आम्ही त्यांना बोलावले, व नेहमीप्रमाणे त्यांनी यावयाचे कबूल केले. ऋषिपंचमीच्या दिवशी, म्हणजे २५ ऑगस्ट १९५२ रोजी, भारताचे उपराष्ट्रपती पुण्यास आले. ते कसे ? तर मुंबईहून सकाळच्या एक्सप्रेसने ! बरोबर चिटणीस नव्हता, शरीररक्षक नव्हता किंबहुना एखादा सेवकही नव्हता. मी सद्गत रामकृष्ण भांडारकर यांना श्रद्धांजली अर्पण करण्यासाठी येत आहे. अशा वेळी अधिकारपदाचा डामडौल योग्य नाही ही भावना ! विनीतवेषेण प्रवेष्टव्यानि नाम आश्रमपदानि ! ! राजभवनात न जाता ते डॉ. बेलवलकर यांच्या घरी उतरले. त्या ऋषिपंचमीला मुख्य भाषण होते हार्वर्ड विद्यापीठाचे संस्कृतचे प्राध्यापक इंगाल्स यांचे; आणि विषय होता "The study of Sankaracarya." "माझ्या व्याख्यानाच्या अध्यक्षस्थानी डॉ. राधाकृष्णन् असणार आहेत याची मला कल्पना नव्हती. ज्या विषयाचे ते स्वतः सर्वश्रेष्ठ अधिकारी आहेत त्या विषयावर बोलण्याची त्यांनी माझ्यासारख्या दूरदेशीच्या विद्यार्थ्याला विनंती करावी यापेक्षा अधिक अनुपपन्न (incongruous) गोष्ट कोणती असू शकेल ?" या शब्दांनी प्रा. इंगाल्स यांनी आपल्या भाषणास प्रारंभ केला. व्याख्यानापूर्वी डॉ. राधाकृष्णन् यांना संस्थेत आणण्यासाठी मी जवळच असलेल्या डॉ. बेलवलकर यांच्या बंगल्यावर गेलो. मला पाहताच ते उद्गारले : Come, Dandekar (माझ्या नावाचा उच्चार करताना ते त्यावर एक विशिष्ट प्रकारचा आघात देत असत), you have come at the right moment. Please help me in my make-up. मला प्रथम काहीच बोध झाला नाही; पण लवकरच माझ्या लक्षात आले. आपला विशिष्ट प्रकारचा लांब कोट अंगात घातल्यावर त्या कोटाच्या गळपट्टीचे हूक लावणे त्यांना जमत नव्हते. आणि त्याच कामी माझी मदत त्यांना हवी होती. पोषाखातील गबाळेपणा त्यांना कधीच खपला नाही. त्यामुळ सार्वजनिक प्रसंगी ते नेहमीच प्रसन्न, रुबाबदार, आणि प्रभावी व्यक्तिमत्त्वाचे असे दिसत असत.

डॉ. राधाकृष्णन् उपराष्ट्रपती असतानाच, १९५५ साली, अखिल-भारतीय-प्राच्यविद्या-परिषदेचे १८ वे अधिवेषन अन्नमलाई विद्यापीठात त्यांच्या अध्यक्षते-खाली भरले होते. त्या वेळी मीच परिषदेचा मुख्य कार्यवाह होतो. अधिवेशनाच्या शेवटच्या दिवशी मला बाजूला नेऊन ते म्हणाले : Dandekar, we are soon entrusting you with a responsible job. Be prepared for it. मला त्या वेळी त्यांच्या म्हणण्याचा काहीच बोध झाला नाही. पण पुढे लवकरच भारत प्रशासनाने नेमलेल्या संस्कृत–आयोगाचा सदस्य सचिव म्हणून माझी नियुक्ती जाहीर झाली.

१९६२ साली डॉ. राधाकृष्णन् भारताचे राष्ट्र-पती झाले. आणि, त्याच वर्षी प्रा. काणे यांचा History of Dharmasastra हा ग्रंथ पूर्ण झाला. एका व्यक्तीने, एकटयाने, लिहिलेला हा हा सुमारे ७००० पृष्ठांचा पंचखंडात्मक ग्रंथ म्हणजे संस्कृत विद्येच्या क्षेत्रातील एक अपूर्व असा चम-त्कार होता. या ग्रंथाच्या शेवटच्या खंडाचे औप-चारिक प्रकाशन डॉ. राधाकृष्णन् यांच्याच हस्ते व्हावे अशी आमची सर्वांची उत्कट इच्छा होती. आणि ती त्यांनी पूर्ण केलीही. १७ नोव्हेंबर १९६२ रोजी झालेल्या या समारंभात डॉ. राधा-कृष्णन् यांनी केलेल्या भाषणाचे मुख्य सूत्र होते : हिंदू धर्माची गतिशीलता. जोड या विद्वानाने एके ठिकाणी म्हटले आहे : हिंदुधर्म हा जड झाला होता; त्याच्यातील चैतन्य नाहीसे होत चालले होते. पण राधाकृष्णन् यांनी त्या धर्माला नवीन प्राणवायू दिला, त्याच्यात एकप्रकारची नवनवोन्मेषशालिता निर्माण केली आणि म्हणूनच त्यांना 'नव हिंदूधर्माचे प्रेषित' म्हणावयास पाहिजे. त्या दिवशीच्या आपल्या भाषणात राधाकृष्णन् म्हणाले : गतयुगातील धर्म-ग्रंथ आजच्या युगातील समस्या सोडविण्यास पर्याप्त ठरतील अशी आशा आपण बाळगू नये. हिंदू धर्म-शास्त्रानेच हे आपणास शिकविले आहे. अन्ये कृत-युगे धर्माः त्रेतायां द्वापरे अपरे. जागतिक परिस्थिती आपणांस पुढे पुढे ढकलीत असता आपण सारखे मागे मागे पाहण्याचा वेडेपणा का करीत आहोत ?

२२ सप्टेंबर १९६६ हा दिवस भांडारकर इन्स्टि-टयूटच्या इतिहासात सुवर्णाक्षरांनी लिहिला जाईल. कारण, त्या दिवशी, इन्स्टिटयूटच्या परिसरात आयोजित केलेल्या एका भव्य समारंभात राष्ट्रपती राधाकृष्णन् यांनी इन्स्टिटयूटने ४० वर्षांपूर्वी अंगी-कृत केलेला Critical Edition of the Mahabharata हा प्रचंड संशोधनप्रकल्प पूर्ण झाल्याचे औपचारिकरीत्या उद्घोषित केले. मला स्वतःला अत्यंत समाधान वाटले ते मी संपादित केलेल्या अनुशासनपर्वाने या प्रकल्पाची यशस्वी सांगता झाली त्यामुळे. राधाकृष्णन् यांनी आपल्या भाषणात या गोष्टीचा मुद्दाम उल्लेख केला त्यामुळे माझे समाधान द्विगुणित झाले. त्या दिवशीचे त्यांचे भाषण म्हणजे मी ऐकलेले त्यांचे शेवटचेच सार्वजनिक भाषण असावे. महाभारताने मानवजातीस दिलेल्या अनेक संदेशांपैकी प्रस्तुत कालास अनुरूप ठरेल अशा एकाच संदेशाची–गांधीजींनी पुरस्कारिलेल्या संदेशाची–डॉ. राधाकृष्णन् यांनी लोकांना आठवण करून दिली.

> मृदुना सुमृदुं हन्ति
> मृदुना हन्ति दारुणम् ।
> ना साध्यं मृदुना किंचित्
> तस्मात् तीक्ष्णतरं मृदु ॥

१९६७ साली डॉ. राधाकृष्णन् राष्ट्रपतिपदा-पासून निवृत्त झाले, आणि ते मद्रास येथे स्थायिक झाले. त्यानंतर दोन-तीन वर्षांनी International Tamil Academy च्या सल्लागारमंडळाच्या एका सभेसाठी सुनीतिकुमार चतर्जी आणि मी मद्रासला गेलो होतो. साहजिकच, त्यावेळी, डॉ. राधाकृष्णन् यांना भेटण्याची इच्छा आम्ही व्यक्त केली. प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळे ते त्या वेळी कोणासही भेटत नसत. पण आमच्या बाबतीत मात्र त्यांनी अपवाद केला. आम्हाला ते शरीराने आणि मनाने–विशेषतः मनाने– अतिशय थकलेले दिसले. देशातील किंबहुना जगातील– एकंदर विपरीत परिस्थितीमुळे ते व्यथित झाले होते. त्या दिवशीची आमची मुलाखत आम्हाला आमच्या नेहमीच्या परिपाठाशी विसंगत अशा रीतीने म्हणजे केवळ ७–८ मिनिटांतच आटो-पावी लागली. आपलेच एक जुने वचन उद्धृत करून, राधाकृष्णन् यांनी आम्हाला निरोप दिला. ते म्हणाले : We have learnt to fly in the air like birds and to swim in the water like fishes, but how to live on the earth like human beings we have still to learn.



अनुक्रमणिका








# उच्च शिक्षणातून विकास*

त्र्यं. कृ. टोपे

गोखले एज्यूकेशन सोसायटीचे आद्य संस्थापक प्राचार्य टी. ए. कुलकर्णी यांच्या जन्मशताब्दी महोत्सवाचा एक भाग म्हणून संस्थेतील महाविद्यालयीन शिक्षकांसाठी आयोजित केलेल्या या चर्चासत्राचा विषय 'विकासासाठी उच्च शिक्षण' ठेवला, याचा मला विशेष आनंद वाटतो. अशा या अनन्यसाधारण मेळाव्यासाठी या विषयापेक्षा दुसरा कोणता अधिक चांगला विषय असू शकेल ? याची विविध दृष्टिकोनांतून चर्चा अपेक्षित आहे, होऊ शकतेही. पण मी फक्त शैक्षणिक धोरणानुषंगानेच चर्चा व्हावी ही भूमिका घेणार आहे.

शिक्षण आयोगाचा अहवाल ( १९६४-६६ ) 'शिक्षण आणि विकास' या शीर्षकाखाली प्रकाशित झाला. आयोगाच्या पुष्कळशा शिफारशींची अमलबजावणी झाली. तरीसुद्धा या शिफारशींच्या अमलबजावणीने राष्ट्रीय विकासाला मोठा हातभार लावला असे कोणीही म्हणू शकत नाही. उलट, काही शिफारशींच्या अमलबजावणीतून राष्ट्रीय समस्या निर्माण झालेल्या आहेत. १९६६ सालीदेखील मी या शिफारशींचे विच्छेदन केले. त्या शिफारशींचा मी एक टीकाकार होतो. आता १९८२ साली प्रसिद्ध झालेल्या अहवालात स्वत: लेखकानेच आपल्या चुकांची कबुली दिलेली आहे. त्या पुढीलप्रमाणे होत.[१]

१) आयोग 'विकासा'चे स्पष्ट आणि स्वच्छ चित्र देऊ शकला नाही.

२) आयोग शिक्षण आणि समाज यांच्या नात्यावर झोत टाकू शकला नाही.

३ ) जे. पी. यांनी स्वतःच अन्या उणिवा मान्य केल्या आहेत.

अ ) "त्यांच्या निदर्शनास असे आले की, आयोग राष्ट्रीय समृद्धीबाबत बोलतो. ज्यामध्ये भारतातील उद्योग, व्यापार यांची वाढ, सर्वांसाठी अधिक धान्य आणि उत्तम आरोग्य गृहीत आहे. परंतु केवळ अशी इच्छा प्रकट करून चालत नाही. त्याला थोडा अर्थ प्राप्त करून द्यावा लागतो. भारत अद्याप गरीब आहे. त्याचे हे दारिद्रय कसे घालवता येईल आणि अद्याप ही गरिबी का ? याबद्दल आयोग फार थोडे मांडतो."

ब) "दुसरी कमकुवत बाजू म्हणजे आयोगाने विकासाचे कितीतरी पैलू अस्पर्शितच ठेवले आहेत. त्यांचा साधा उल्लेखही त्यात नाही. त्यात जागतिक पातळीचाही समावेश होतो. आंतरराष्ट्रीय आर्थिक क्रम आणि विकसित राष्ट्रांकडून विकसनशील राष्ट्रांची होत असलेली पिळवणूक लक्षणीय आहे. राष्ट्रीय पातळीवर त्यांनी मालकी हक्काच्या मालमत्तेचा तिरकस डोलारा उभा केला आहे. आपण सुरू केलेल्या जुलमी आणि संतापजनक रोजगारीनेच सामाजिक आणि सांस्कृतिक दारिद्रय सिद्ध झाले. सामाजिक, राजकीय, आर्थिक संदर्भातील मोठ्या प्रमाणावर निर्माण झालेली विषमता, पिळवणूक, बेरोजगारी, आर्थिक राजकीय शक्ती आणि बुद्धिमत्ता सारेच अल्पसंख्याकांच्या हाती मूठभरांकडे केंद्रित झाले आहे. बहुसंख्यांना मात्र यांपासून वंचित राहावे लागले आहे. नव्हे त्यांना दूर ठेवले."[२]

भारताच्या दोन्ही आर्थिक आणि राजकीय नवीन समाजवादी रचनेची मांडणी असलेल्या पुस्तकातून वरील उतारा घेतला असे वरील उतारा वाचून वाटेलही. भारताच्या लोकशाहीवादी भूमिकेतूनच राजकीय, आर्थिक आणि शैक्षणिक रचना आणि

---

* मूळ इंग्रजी लेख- श्री. त्र्यं. कृ. टोपे. मराठी अनुवाद- श्री. भा. व्यं. गिरधारी [ गोखले एज्यूकेशन सोसायटीने आयोजित केलेल्या चर्चासत्रात वाचलेला निबंध अनुवादरूपाने संयोजकांच्या सौजन्याने येथे प्रसिद्ध केला आहे. – संपादक ]

नियोजन केलेले आहे. पण या उताऱ्यातून हे स्पष्ट होते, की आयोगअहवाल–लेखकाला १९८० सालीदेखील शिक्षण आणि विकासाच्या संकल्पना नीट स्पष्ट झालेल्या नाहीत.

वास्तव उच्च शिक्षण आणि विकास यांच्यातील जवळचे नाते जर स्पष्ट व्हायचे असेल, तर या अहवालाचा पुरेसा विचार करणे क्रमप्राप्त आहे. उच्च शिक्षण आणि विकास या संदर्भात विद्यापीठीय अभ्यासक्रमावर लक्ष केंद्रित केले पाहिजे. सभोवतालच्या परिस्थितीच्या विकासाच्या भूमिकेतून विद्यापीठाच्या अभ्यासक्रमांना तपासले पाहिजे. याचा अर्थ असा की, विद्यापीठांतून मूलगामी संशोधनाबरोबरच आपल्या विभागातील समस्यानिवारणाचाही अग्रक्रमाने प्रयत्न झाला पाहिजे. या विकासप्रक्रियेत शिक्षक आणि विद्यार्थी यांचा सक्रीय सहभाग अपेक्षित आहे. परंतु या सर्व मुद्द्यांवर आयोगाने मौन पाळले आहे.

श्री. नाईक स्वतःच 'आयोगामध्ये कोणीही समाज-वैज्ञानिक समाविष्ट नव्हता' हे सखेद नमूद करतात. त्यांनी हे निदर्शनाला आणून दिले की, अहवालाच्या अमलबजावणीसाठी राजकीय लोकसुद्धा एकत्र आलेले नव्हते. उच्च शिक्षणाला जर विकासप्रक्रियेतील आपला वाटा उचलावयाचा असेल तर राजकारणी, उद्योजक, समाजचिंतक या सर्वांनीच शैक्षणिक नियोजनात सहभागी झाले पाहिजे. त्यामुळे नवा दृष्टिकोन लाभू शकतो.[३]

शिक्षण आणि विकासाच्या संदर्भात आणखी एक मुद्दा विचारात घेण्याजोगा आहे. भारतीय पातळीवरूनच शैक्षणिक पद्धतीच्या पुनर्रचनेचा विचार केला जातो. शिक्षणतज्ज्ञ नेहमी राष्ट्रीय धोरणाबद्दलच बोलतात. कोणताही शिक्षणविषयक प्रश्न मग तो माध्यमाचा वा शिक्षणविषयक विचाराचा असो. शिक्षणातून जर खरोखरच विकास साधावयाचा असेल तर हे राष्ट्रीय धोरण हमखास अपयशी ठरणारच. कारण विकास हा निःसंशय विभागीय प्रश्न आहे. अशा समस्या केवळ राज्याराज्यांत भिन्न असतात असे नव्हे; तर एका राज्यांतर्गतही त्यांत भिन्नता असते. म्हणूनच शिक्षणविषयक राष्ट्रीय धोरण हे विकासाच्या मार्गातील अडथळा ठरू शकते. राष्ट्रीय धोरण साचेबंद असते; एवढेच नव्हे, तर राष्ट्रीय धोरण स्वीकारल्यानंतर केंद्रशासन सर्व राज्यांत या धोरणाची अमलबजावणी करू शकत नाही. त्यासाठी आपल्याला शिक्षणातील आजचा नवा १०+२+३ हा प्रयोगही उदाहरण म्हणून घेता येईल. भारतातील सर्व राज्यांनी ही शिक्षणपद्धती स्वीकारली नाही. हा नवा साचा न स्वीकारणाऱ्या राज्य व केंद्रशासित प्रदेशांची यादी पुढीलप्रमाणे (१९८१ मध्ये) देता येईल. १) हरियाना, २) मध्यप्रदेश, ३) मेघालय, ४) पंजाब, ५) राजस्थान, ६) उत्तर प्रदेश, ७) मिझोराम, ८) हिमाचल प्रदेश.[४]

याचा अर्थ असा, की केंद्र आणि राज्ये यांचे शासन एकाच राजकीय पक्षाच्या हाती असून नवी शिक्षणपद्धती राबविण्याची राजकीय इच्छा दिसत नाही. यावरून राष्ट्रीय धोरण संपूर्णपणे ग्राह्य मानायला शंकास्थळ निर्माण होते. राजकीय इच्छा आणि विकासासाठी शैक्षणिक धोरण या दोन्हींच्या बाबतीत हाच अनुभव येतो.

सहावी पंचवार्षिक योजना विकासाच्या दृष्टिकोनातून उच्च शिक्षणाच्या समस्येकडे पाहते. या योजनेत असे निदर्शनास आले आहे, की उच्च शिक्षणसंस्थांना अधिक उत्तेजन दिले पाहिजे आणि सामाजिक विकासाच्या चळवळीत त्यांना सहभागी करून घेतले पाहिजे. विद्यार्थी आणि शिक्षकांकडून सामाजिक गरजा भागविल्या गेल्या पाहिजेत. हे सेवाविस्तारकार्य हे समाजसेवा न मानता शिक्षक आणि प्राध्यापक यांच्या दैनंदिन कामाचाच एक भाग मानला पाहिजे. विद्यापीठानेही केवळ ज्ञानदानाचेच क्षेत्र आपले आहे असे न मानता आपण ज्या समाजावर अवलंबून आहोत त्या समाजाच्या समस्या सोडविण्यासाठी आवश्यक असलेले ज्ञान दिले पाहिजे. उच्च शिक्षणाचा सध्याचा जो साचा आहे त्यात या गोष्टींकडे संपूर्णपणे दुर्लक्ष झालेले आहे. वस्तुतः हा साचा शिक्षण आयोगाच्या शिफारशीवर आधारित आहे. विद्यापीठांना त्यांच्या अपयशाबद्दल दोष दिला जातो; परंतु शिक्षण आयोगाचा अहवाल हा खरा अपराधी आहे.

विकासाची ही प्रक्रिया ठामपणे निश्चित करता येत नसते. त्यात परिवर्तनशीलतेला वाव असावा. त्याचा अर्थ शिक्षणपद्धतीतही परिवर्तन असावे.

दुर्दैवाने शैक्षणिक धोरणांची विशुद्धता राखणारी ही आवश्यक बाब राष्ट्रीय धोरण आखताना शिक्षण-तज्ज्ञांकडून संपूर्णपणे दुर्लक्षिली गेली. विकासासाठी शिक्षण म्हणजे असे धोरण असायला हवे, की त्याने आपापल्या विभागातील विकासाला हातभार लावला पाहिजे. त्या भागातील शिक्षणसंस्थांचे हे कार्य आहे. अशा प्रकारचा विकास म्हणजे प्रत्यक्ष उद्योग, कृषी या दृष्टिकोनांतून संबंधित भागाचा विकास होय. त्याबरोबरच त्या भागातील लोकांची नैतिक, बौद्धिक आणि सामाजिक वाढ होय. याचा अर्थ असा, की समजा एखादी शिक्षणसंस्था आदिवासी भागातील असेल तर तिने आपले ध्येय आदिवासी लोकांच्या सामाजिक, शैक्षणिक, सांस्कृतिक आणि आर्थिक विकासाचेच ठेवले पाहिजे. अशा संस्थेत दिले जाणारे शिक्षण या उद्दिष्टांवरच लक्ष केंद्रित करणारे असावे. भारत हा अतिविशाल देश असल्याने एका भागाच्या समस्यांपासून दुसऱ्या भागाच्या समस्या विकासाच्या दृष्टीने भिन्न भिन्न आहेत.

लोकशाही देशातील विकास हा विकेंद्रीकरणाशी आणि अधोगतीशी संबंधित आहे. स्वातंत्र्यपूर्वकाळात उच्च शिक्षणाची अत्यंत समाधानकारक पद्धती अस्तित्वात होती. विद्यापीठांना स्वतःचे धोरण ठरविण्याचे स्वातंत्र्य होते. याचा सुपरिणाम म्हणजे स्वातंत्र्यपूर्वकाळात विद्यापीठांनी चारित्र्यवान आणि खऱ्या अर्थाने सुशिक्षित माणसे घडविली, ज्यांनी समाजाच्या राजकीय, सामाजिक, सांस्कृतिक आणि आर्थिक जीवनाला समृद्ध केले. विद्यापीठांनी देशाला असा सुशिक्षित माणूस दिला, की जो देशाच्या स्वातंत्र्यासाठी लढला आणि अशिक्षितांनाही त्याने स्वातंत्र्यचळवळीत भाग घेण्यास उद्युक्त केले. ज्यांनी या पद्धतींचा अव्हेर केला, त्यांना नेमके काय अभिप्रेत होते ते ठाऊक नाही. मी एवढेच मांडेन, की आपण काय करतो आहोत हे ज्यांना ठाऊक नाही त्यांना परमेश्वरच क्षमा करो.

भारताने अशी राज्यघटना स्वीकारलेली आहे, की जिच्या भूमिकेत आपल्याला कोणते उद्दिष्ट गाठावयाचे आहे हे पुरेसे स्पष्ट केलेले आहे. म्हणून अशा धोरणासाठी पात्र असे पुरुष व स्त्रिया घडविणारी शिक्षणपद्धती तयार केली पाहिजे. जर विद्यापीठांना आपण पूर्ण स्वायत्तता दिली असती, तर त्यांना हे साध्य करता आले असते; पण दुर्दैवाने १९५३ साली भारतीय पातळीवरील एक समिती, जिला विद्यापीठ अनुदान मंडळ म्हणतात, ती लोकसभेने जन्माला घातली. माझा दृढ विश्वास आहे, की या मंडळाची स्थापना भारतीय उच्च शिक्षणातील शोकप्रद घटना आहे. या मंडळाने विद्यापीठांचा पुढाकार संपुष्टात आणला. उच्च शिक्षणातील शहाजूकपणाचा मक्ता स्वतःकडे घेतला आणि अप्रत्यक्षपणे विद्यापीठाच्या प्रगतीचा नैसर्गिक विकास थोपविला. पहिल्या जागतिक युद्धात चर्चिल्या गेलेल्या 'सुरक्षा सिद्धान्ता'वर (Convoy Theory) आधारित हे विधान मी मुंबई विद्यापीठाच्या उदाहरणाने स्पष्ट करू इच्छितो. या विद्यापीठाने आपल्या स्वतःच्या विभागांची स्थापना केली त्या वेळी विद्यापीठ अनुदान मंडळाचा जन्मही झालेला नव्हता. या विभागांत रासायनिक तंत्रविज्ञान, समाजशास्त्र-विभाग, अर्थशास्त्रविभाग यांचा समावेश होता. आपापल्या भागात उत्कृष्ट कामगिरी बजावून या विविध विभागांनी राष्ट्रीय विकासाला मोठाच हातभार लावला. तुम्ही या विभागाने मिळविलेल्या यशाची तुलना याच विद्यापीठातील यु. जी. सी. च्या मार्गदर्शनाखाली चालविलेल्या विभागाशी करून पाहावी.

विद्यापीठ अनुदान मंडळाची सर्वांत मोठी चूक म्हणजे या मंडळाने प्रयोग न करताही १०+२+३ या शिक्षणपद्धतीची शिफारस केली. वस्तुतः हा प्रयोग स्वतःचे अपत्य असलेल्या केंद्रीय विद्यापीठात करता आला असता. या नव्या शिक्षणपद्धतीच्या प्रारंभाने काय परिणाम झाला हे मी सांगायची गरज नाही. याने जुन्या स्थिर पद्धतीला फाटा दिला. वस्तुतः थोड्याफार सुधारणा करून हीच पद्धती विकासाभिमुख होऊ शकली असती. परंतु ती आशा आता संपली. श्री. वाय. पी. धवन यांनी आपल्या २४-१०-८२ च्या 'टाईम्स ऑफ इंडिया'तील लेखात असे निदर्शनास आणून दिले आहे की, **आपल्या देशातील शिक्षणाचा विनाश शिक्षणतज्ज्ञांनीच केला आहे.** (जाड ठसा माझा.) मला खरोखरच याचे आश्चर्य वाटते की, एकाही शिक्षणतज्ज्ञाने याला विरोध केला नाही. ही टीका खरी आहे. शिक्षणविषयक धोरण ठरविणाऱ्यांना ती लागू आहे.

अनुक्रमणिका

मला आशा होती की, विद्यापीठ अनुदान मंडळातील कोणीतरी पुढे येऊन बाजू मांडील; परंतु माझी घोर निराशा झाली.

जर शिक्षण हे विकासाचे हत्यार असेल, तर केंद्र शासनाने ठरविलेल्या ध्येयधोरणाच्या संदर्भात प्रत्येक राज्याला आपले स्वतःचे ध्येयधोरण ठरविण्याचे स्वातंत्र्य असावे. जर विद्यापीठ अनुदान मंडळ संपुष्टात आणले तर ते शक्य होईल.[६] राज्य विधानसभेने स्वतःचे राज्य विद्यापीठ अनुदान मंडळ प्रत्येक राज्यासाठी निर्माण करणे आवश्यक आहे. असे हे राज्य विद्यापीठ अनुदान मंडळ, विकासासाठी शिक्षणाचे अनुकूल धोरण ठरवू शकेल. नियोजन मंडळाने विविध ज्ञानशाखांच्या सदस्यांच्या, तरुण संशोधकांच्या विकाससमस्येच्या संदर्भात आणि काही विशिष्ट संशोधनप्रकल्पांच्या संदर्भात कितीतरी बैठका घेतल्या. या बैठकांतून अशी शिफारस करण्यात आली की, विद्यापीठाने खालील गोष्टी सुरू कराव्यात :

१) आपापल्या ज्ञानशाखांच्या मर्यादा न मानता आंतरशाखाभ्यास सुरू करावेत.

२) जास्तीत जास्त विद्यार्थ्यांचा या कृतिशील कार्यक्रमात, संशोधनात, पाहणीत, संकलनात आणि माहितीविश्लेषणात सहभाग असावा.

३) विद्यापीठांकडून कॉलेज-अधिकाऱ्यांवर असा ठसा उमटविला गेला पाहिजे, की महाविद्यालयांतून संशोधन होऊ शकत नाही हा त्यांचा अपसमज आहे व तो काढून टाकला पाहिजे.

भारतातील विद्यापीठांत चालू असलेल्या संशोधनात विकासोन्मुख कृतीला महत्त्व देणारे उपक्रम असावेत; ज्यांत लोक स्वतः होऊन सहभागी होतील, ही गोष्ट महत्त्वाची आहे.

या आणि अशाच विकासासाठी शिक्षण चळवळी काही गोष्टींची पूर्तता झाल्यास चालू राहतील. त्या पुढीलप्रमाणे होत :

१) **विधानसभेने राज्य विद्यापीठीय अनुदान मंडळ स्थापन करणे**– विद्यापीठ अनुदान मंडळाचे सभासदत्व फक्त शिक्षण तज्ज्ञांपुरतेच मर्यादित असू नये. असे म्हटले जाते, की युद्धाचे निर्णय घेणे हे फक्त सेनाधिकाऱ्यांवरच सोपविणे चुकीचे आहे. तद्वतच शिक्षणाचेही धोरण फक्त शिक्षणतज्ज्ञांकडे सोपविणे धोकादायक आहे. या अनुदान मंडळावर समाजचिंतक, कृतिशील समाजवैज्ञानिक, तंत्रज्ञ, व्यापारी, उद्योगपती, नियोजक, कृषितज्ज्ञ, ग्रामीण विकास अधिकारी, वित्ततज्ज्ञ या संदर्भातील राज्याचे प्रतिनिधी असावेत. कृषी आणि इतर विद्यापीठांतील कुलगुरू हे या समितीचे पदसिद्ध अधिकारी असावे. प्राध्यापक मंडळाचे प्रतिनिधीही या मंडळाचे सदस्य असावेत.

२) या विद्यापीठ अनुदान मंडळाची जबाबदारी अशी राहील, की राज्य आणि राष्ट्रीय योजना यांचा नीट अभ्यास करून एक अभ्यासक्रमाचा स्थूल आराखडा तयार करून त्याची अमलबजावणी आणि या योजनांचे उद्दिष्ट राज्याच्या विकासाच्या दृष्टीने आपल्या भागाची गरज भागविणारे असेच अभ्यासक्रम मग आपोआप तयार केले जातील. हे अभ्यासक्रम प्रत्येक विद्यापीठाचे वेगवेगळे असतील. तसेच विद्यापीठातील विभागदेखील विकासोन्मुख राहतील, असेच सुरू करता येतील. अन्य क्षेत्रांतील संशोधनाची जबाबदारी प्रतिथयश आणि रुळलेल्या महाविद्यालयांवर सोपवावी आणि विद्यापीठांतील प्राध्यापक व प्रपाठकांच्या जागा त्या ठिकाणी निर्माण करण्यात याव्यात. विकासासाठी शिक्षण म्हणजे सतत बदलणाऱ्या सामाजिक आणि आर्थिक परिस्थितीनुसार अभ्यासक्रमातही सतत सुधारणा होणे. हा बदल त्या त्या विभागाच्या आर्थिक आणि सामाजिक पाहणीनुसार केला गेला पाहिजे. उद्योग, व्यापार, सहकार क्षेत्र आणि प्रशासन यांच्या प्रतिनिधींचा अभ्यासक्रमाच्या संरचनेतील सहभाग हा केवळ अपेक्षित नाही तर अनिवार्य आहे. जर शिक्षणाला आपली महत्त्वाची भूमिका बजावयाची असेल, तर आपण तयार केलेला योग्य आराखडा विचारात घेतला पाहिजे. या हेतुसिद्धीसाठी श्री. जे. पी. नाईक यांनी काढलेले निष्कर्ष या संदर्भात उपयुक्त आहेत. ते पुढीलप्रमाणे होत :

"सध्या आपली उच्च शिक्षणपद्धती ही बहुतांशाने अभिजात आदर्शावरच अवलंबून आहे. भावी काळातील उच्च शिक्षणही आपणास वेगवेगळ्या संस्थांच्या माध्यमातून द्यावे लागणार आहे.[७]"

या संदर्भामध्ये आपण पदविका आणि प्रमाणपत्र-परीक्षांचा विचार केला पाहिजे. या अभ्यासक्रमाच्या

अध्यापनाची जबाबदारी महाविद्यालयांनीच उचलली पाहिजे. नवीन संस्था स्थापन करण्याची आवश्यकता नाही. परंतु आपण सध्याच्या संस्थांची नव्याने रचना करण्याची गरज आहे. या संदर्भातील उपयुक्त सूचना शासनाला नव्या विद्यापीठस्थापनेच्या संदर्भात अहवाल सादर करून केल्या आहेत.[८] विकासासाठी शिक्षण याचा अर्थ विद्यापीठाच्या शिक्षणाच्या मर्यादा मान्य करणे होय. पारंपरिक पद्धतीने अभ्यासक्रम तयार करण्याच्या स्वायत्ततेच्या या मर्यादा होय. विद्यापीठांनी समाजाला चारित्र्यवान आणि सुशिक्षित स्त्रीपुरुष दिले पाहिजेत व विकासप्रक्रियेतही प्रत्यक्ष सहभागी झाले पाहिजे. त्यांनी भारतीय नागरिकांना सामाजिक आणि आर्थिक न्याय मिळवून दिला पाहिजे. अशा रीतीने विद्यापीठाने या दोन पातळ्यांवर निदान दोन अभ्यासक्रम सुरू केले पाहिजेत.

गेल्या काही वर्षांत महाराष्ट्रातील विद्यापीठे आर्थिक दृष्ट्या राज्यसरकारवर अवलंबून आहेत. यावरून विद्यापीठाने आपल्या अंतर्गत कामाच्या मर्यादा स्वीकारल्या आहेत असा अर्थ निघतो. तरीही आज विद्यापीठांची शासनाकडे अधिक अनुदानाची मागणी आहे. परंतु ही विद्यापीठे शासन आणि समाजाला त्यांच्या अभ्यासक्रमाबद्दल उत्तर देण्यास जबाबदार नाहीत. या परिस्थितीवर राज्यविद्यापीठ अनुदान मंडळाची स्थापना हा उचित तोडगा आहे. हे मंडळ विद्यापीठांच्या आर्थिक गरजा भागवील आणि विद्यापीठांनी अमलात आणावयाच्या अभ्यासक्रमाच्या स्थूल रूपरेषा सूचित करू शकेल. राज्यशासनाची जबाबदारी विधानसभेला राहील व ती राज्य विद्यापीठ अनुदान मंडळस्थापना अर्थपूर्ण होईल.[९]

विकास याचा अर्थ सर्व बाजूंनीच; म्हणून विकासासाठी शिक्षण पदवीपर्यंतचेच असे म्हणता येत नाही. विकासासाठी विविध गरजा असतात. यास्तव विद्यापीठाने पदविका आणि प्रमाणपत्र-अभ्यासक्रम सुरू केले पाहिजेत. यासाठी प्रवेशाची पद्धत बदलून सुधारणा केल्या पाहिजेत. दुसऱ्या शब्दांत सांगावयाचे झाल्यास उच्च शिक्षणासाठी संपूर्णपणे नव्या धोरणाचा स्वीकार केला पाहिजे. असे हे धोरण अखिल भारतीय असू शकत नाही. भारत सरकारने यापुढे असा शिक्षण आयोग नेमू नये; कारण याचे परिणाम आता ज्ञात आहेत. राज्याच्या विकासासाठी ज्या शैक्षणिक गरजा असतील, त्यांना तोंड देणारा शिक्षण आयोग राज्यशासनानेच नेमावा, असे मी नम्रपणे सुचवू इच्छितो. या आयोगात उद्योग, व्यापार इ. विविध समित्यांचे प्रतिनिधी समाविष्ट असावेत. आणि मानवी आणि राज्याच्या प्राकृतिक साधनसंपत्तीच्या विकासासाठी या कमिशनवर शैक्षणिक योजना करण्याची जबाबदारी सोपवावी.

## निष्कर्ष

शिक्षणातून विकास साधावयाचा हे तत्त्व मान्य असल्यास आपण खालीलप्रमाणे त्वरित पावले टाकली पाहिजेत :

१) शिक्षणविषयक राष्ट्रीय धोरण असले पाहिजे हे सोडून फक्त राष्ट्रीय चौकट शिक्षणासाठी मान्य करावी; आणि या राष्ट्रीय चौकटीत राहूनच शैक्षणिक धोरण ठरविण्याचे अधिकार राज्याला असावे. यामुळे शैक्षणिक धोरणात राष्ट्रीय चौकटीच्या संदर्भात परिवर्तन आढळेल.

२) सध्याचे भारतीय विद्यापीठ अनुदान मंडळ बरखास्त करावे.

३) राज्य विधानसभेच्या कायद्याचा प्रत्येक राज्यात राज्य विद्यापीठ मंडळ स्थापनेसाठी वापर करणे.

४) शिक्षण आयोगाच्या १९६४–६६ ची कागदपत्रे पुराभिलेख विभागाकडे सोपविणे.

५) विकासप्रक्रियेत शैक्षणिक संस्थांचा प्रभावी सहभाग होण्यासाठी अहवाल तयार करण्याची जबाबदारी प्रत्येक राज्याने स्वीकारणे.

३) सध्याच्या विद्यापीठ कायद्याला महाराष्ट्रात कालबाह्य ठरवून त्या जागी नवा विद्यापीठ कायदा अमलात आणावा; जो विकासाच्या प्रक्रियेत विद्यापीठाला महत्त्वाची भूमिका बजावयाला भाग पाडील.

७) नवीन कायद्यानुसार विविध समित्या करून प्रभावी व कार्यक्षम राहण्यासाठी सुटसुटीत समित्या स्थापन करणे.

८) विद्यापीठांच्या कुलपतींना कार्यपद्धतीत महत्त्वाची भूमिका बजावण्यासाठी जादा अधिकार देणे.

९ ) विद्यापीठे ही समाजाला, अभ्यासक्रम तयार करणे आणि आर्थिक व्यवहार यांसाठी जबाबदार राहतील.

माझे हे विचार अभ्यासले व चर्चिले जावेत म्हणून सादर केले आहेत. मी विचारस्वातंत्र्याचा पुरस्कर्ता असल्याने माझ्या दृष्टिकोनाविरुद्ध अशा टीकेचेही मी स्वागतच करीन. जर यातून अधिक चांगला आराखडा तयार करण्यासाठी काही उपसूचना मिळाल्या तर विकासाच्या हेतुसिद्धीसाठी त्यांचे स्वागत होईल.

आपण आता अंतर्मुख होऊन आपल्याबद्दल बोलले पाहिजे. कितीही आदर्श शैक्षणिक धोरण असले, तरी समाधानकारक अभिव्यक्तीशिवाय ते यशस्वी होत नाही. याचा अर्थ आम्हा शिक्षकांना हे धोरण राबविण्याची ज़बाबदारी जोपर्यंत कळत नाही, तोपर्यंत कोणतेही धोरण यशस्वी होऊ शकत नाही. भारताचा नागरिक म्हणून मी आपणास स्मरण देऊ इच्छितो, की 'आपण सर्व नागरिकांना सामाजिक, आर्थिक, राजकीय न्याय मिळवून देण्यास वचनबद्ध आहोत.' ते आपले घटनात्मक कर्तव्य आहे. आम्ही शिक्षणाच्या क्षेत्रात आपली भूमिका बजावण्याचे काम पत्करले आहे, ते स्वेच्छेने आणि आणि सावधगिरीने बजावले पाहिजे. स्वतंत्र भारतात आपली प्रार्थना टागोरांच्या शब्दांत थोडा बदल करून अशी असली पाहिजे –

"In to the heaven of prosperity,
My Father, let my Country awake."

## संदर्भ व टीपा

१ ) 'The Education Commission and After' J. P. Naik (Allied Publication) p. 172.

२ ) पूर्वोक्त. पा. ५६.

३ ) महाराष्ट्र शासनाने महाराष्ट्रात तीन नवीन विद्यापीठे स्थापन करण्यासाठी नेमलेल्या तीन समित्यांचे अहवाल पाहावे. त्या समित्या पुढीलप्रमाणे होत्या. ( १ ) कोकण विभागात तंत्रज्ञान विद्यापीठ स्थापन करण्यासाठी नेमलेली समिती–अध्यक्ष श्री. ह. गो. उर्फ भाऊसाहेब वर्तक (१९८१). (२) उत्तर महाराष्ट्रात विद्यापीठ स्थापन करण्यासाठी नेमलेली समिती (१९८२). अध्यक्ष श्री. भाऊसाहेब वर्तक. (३) विदर्भ प्रदेशात दुसरे विद्यापीठ स्थापन करण्यासाठी नेमलेली समिती (१९८२). अध्यक्ष श्री. त्र्यं. कृ. टोपे.

४ ) 'The Education Commission and After' J. P. Naik, p. 289.

५ ) The Times of India ऑक्टोबर २४, १९८२, p. IV.

६ ) विद्यापीठ अनुदान मंडळाचे अपयश अनेक क्षेत्रांत आहे, संसदेच्या 'पब्लिक अकौंट्स कमिटीने' विविध विद्यापीठांतील भ्रष्टाचाराकडे लक्ष वेधतांना विद्यापीठ अनुदान मंडळाचाही निर्देश केला केला आहे.

७ ) 'The Education Commission and after', J. P. Naik, p. 192.

८ ) टीप ३ पाहावी.

९ ) विद्यापीठ अनुदान मंडळ विद्यापीठे व महाविद्यालये यांना अनुदान देते. जर हे मंडळ बरखास्त केले तर भारत सरकारच्या शिक्षण मंत्रालयाकडून राज्यसरकारच्या शिक्षणखात्याला ही अनुदाने मिळू शकतील.



# विज्ञान व तंत्रविद्येतील प्रगतीकरिता काय केले पाहिजे ?

व. त्रि. चिपळोणकर

अमेरिकेच्या बाजारात मिळणारी बहुतांश इलेक्ट्रॉनीय उपकरणे व साधने ही आशिया व त्यातल्या त्यात जपान या देशामधून आयात होऊ लागली आहेत. यामध्ये हाय-फाय संगीत वाद्यसंच, व्हिडिओ, गणक यंत्रे, अंकीय इलेक्ट्रॉनीय घड्याळे यांचा समावेश आढळतो. "तुमच्या नातवाचे इलेक्ट्रॉनीय घड्याळ अमेरिकन बनावटीचे असावे, त्याने अमेरिकन बनावटीची मोटारगाडी वापरावी, अशी जर तुमची इच्छा असेल, तर त्याकरिता आतापासूनच योग्य पावले टाकावयास सुरुवात करा, देशभर विज्ञान व तंत्रविद्येला प्रोत्साहन मिळून परत सबंध देश तंत्रज्ञांनी गजबजेल असे करा. नाही तर जपानमध्ये बनविलेल्या लष्करी साधनसामग्रीचा उपयोग करून आपल्या देशाचे संरक्षण करण्याची पाळी त्याच्यावर येण्यास वेळ लागणार नाही" असे नाट्यपूर्ण आवाहन एका अमेरिकन लेखात करण्यात आले आहे.

आतापर्यंत विज्ञान व तंत्रविद्या या दोन्ही विषयांत अमेरिका सर्व देशांमध्ये आघाडीवर आहे, असा जगातील सर्व लोकांचा समज होता. हा समज होण्याकरिता भक्कम आधार पण होता. गेल्या काही वर्षांत विज्ञानविषयातील नोबेल पारितोषिके ज्यांनी मिळविली अशा शास्त्रज्ञांच्या यादीवर दृष्टिक्षेप टाकला असता याबद्दल खात्री पटत होती. या गोष्टीचा थोडा अधिक विचार केला तर असे लक्षात येते की, ज्या संशोधनकार्याबद्दल ही पारितोषिके देण्यात आली ते संशोधनकार्य प्रत्यक्षात त्या पूर्वी १०–२५ वर्षे आधी संपन्न करण्यात आले होते. संबंधित संशोधकाचे स्वतःचे शिक्षण विसाव्या शतकाच्या पहिल्या अर्धशतकात पूर्ण झाले होते. यांपैकी काही संशोधक तर आपले विज्ञानशिक्षण यूरोपमध्ये पूर्ण करून नंतर अमेरिकेमध्ये संशोधन करण्याकरिता आले होते. त्या काळी अमेरिकेमध्ये संशोधनाला सध्यापेक्षा खूप जास्त महत्त्व दिले जात होते. त्यावर मोठ्या प्रमाणात भांडवली गुंतवणूक केली जात होती. उपकरणांची समृद्धी, जास्त वेतन आणि आर्थिक उन्नती करण्याची संधी यांमुळे जगातील विविध देशांतील संशोधक अमेरिकेकडे आकर्षिले जात होते. अमेरिकेस मिळालेली नोबेल पारितोषिके ही या सर्व गुंतवणुकीवर मिळालेला लाभांश असे याचे वर्णन एका शास्त्रज्ञाने केले आहे.

आज ही परिस्थिती अमेरिकेमध्ये राहिली नाही. संशोधनकार्यावर होणाऱ्या खर्चाचे प्रमाण आज अमेरिकेत सर्वोच्च नाही. आज यूरोपमध्ये सहकार्याने होणाऱ्या संशोधनावरील वार्षिक गुंतवणूक अमेरिकेमधील याच प्रकारच्या गुंतवणुकीच्या दुप्पट आहे. जपान व रशिया या दोन्ही देशांत संशोधन व संशोधक या दोहोंना सक्रिय प्रोत्साहन दिले जाते. रशियामध्ये वैज्ञानिकाला जेवढ्या सुविधा व आर्थिक प्रलोभने दिली जातात, तेवढी इतरत्र फार थोड्या देशांत दिली जात असतील.

जगामध्ये चलन-फुगवटा व लष्करी संरक्षणसामग्रीवर वाढता खर्च यांमुळे देशाला इतर अनेक बाबतींत काटकसर करण्याची वेळ येते. ही काटकसर बहुधा उच्च शिक्षण व संशोधन या विभागांवर होणाऱ्या खर्चामध्ये प्रथम केली जाताना दिसते. ही प्रवृत्ती दीर्घकालीन उद्दिष्टाच्या दृष्टीने पाहता बरोबर असत नाही. जगातील लोकसंख्या सारखी वाढत जात आहे. देशातील सर्व लोकांकरिता आवश्यक अशा गोष्टींचा पुरवठा करण्याकरिता विज्ञान व तंत्रविद्या यांची मदत घेतल्याशिवाय चालणार नाही. चैनीच्या वस्तू जरी सोडल्या, तरी अन्नधान्य, कपडे, निवारा व ऊर्जा या मूलभूत गरजा इतर कोणत्याही उपायाने भागविता येतील असे दिसत नाही. संरक्षणउपकरणेसुद्धा दिवसेंदिवस जास्त सुविकसित व तांत्रिक स्वरूपाची अशी होत आहेत.

अनुक्रमणिका

त्यांचा योग्य प्रकारे वापर करण्याकरिता म्हणूनसुद्धा देशातील सामान्य मनुष्याच्या तांत्रिक ज्ञानाची पातळी पुरेशी उच्च असली पाहिजे, हे स्पष्ट आहे. विज्ञान व तंत्रविद्येमध्ये सारखी झपाट्याने प्रगती होत आहे. त्यामुळे देशातील तंत्रविद्येची पातळी सतत उच्च स्तरावर ठेवण्याकरिता श्रम व प्रयास करणे आवश्यक असते. हे उद्दिष्ट साध्य करण्याकरिता संशोधन करावे लागते आणि विद्वान व तंत्रविद्या शिकविण्याकरिता चांगल्या प्रतीचे शिक्षक पण लागतात. देशाच्या आर्थिक कुवतीच्या मर्यादेमुळे हे करणे जर शक्य नसेल, तर काही मर्यादित संख्येच्या शिक्षणसंस्था अथवा संशोधनसंस्था यांमध्ये या गोष्टी अमलात आणून अशा संस्थांमधून तरी ज्ञान व कौशल्य यांचा उच्च दर्जा कायम टिकविण्याकरिता प्रयत्न करावा असे म्हणावेसे वाटते. जैवतंत्रविज्ञान या विषयावरील उपयोजित संशोधनाला प्रोत्साहन देण्याकरिता फ्रेंच सरकारने एक निराळा प्रयोग सुरू केला आहे. मूलभूत प्रकारचे संशोधन करणारे विश्वविद्यालय व संशोधनसंस्था यांमधील शास्त्रज्ञ व प्रत्यक्ष उद्योगधंद्यांत काम करणारे तंत्रज्ञ व इंजिनिअर यांमध्ये संपर्क घडवून आणण्याकरिता विशिष्ट संस्था या देशात स्थापन केल्या आहेत. उद्योगधंद्यांत काय अडचणी येतात याची माहिती संशोधकास मिळून त्यावर उपाययोजना त्याकडून सुचवली जाण्याची शक्यता यामुळे उत्पन्न होते. संशोधनशाळांमधून चाललेले सर्वच्या सर्व संशोधन उपयोजित स्वरूपाचे अथवा व्यवहारात ज्याचा ताबडतोब उपयोग होईल याच प्रकारचे असावे असा आग्रह धरणे बरोबर नाही, हे आता सर्वमान्य झाले आहे; पण देशासमोर असणाऱ्या तत्कालीन समस्यांच्या संदर्भात संशोधनाकरिता स्थूल स्वरूपात उद्दिष्टे फ्रेंच सरकार स्पष्ट करणार आहे. पश्चिम यूरोपातील बारा राष्ट्रांनी एकत्र येऊन कण प्रवेगक व मूलकण या विषयांवर संशोधन करण्याकरिता काही संशोधनशाळा चालविल्या आहेत. हा मार्गसुद्धा इतर राष्ट्रांनी अनुसरण्याजोगा आहे.

आतापर्यंत अमेरिकेचे असलेले विज्ञान व तंत्रविद्या यांमधील सर्वोच्च स्थान तिच्यापासून हिरावून घेण्याकरिता जी राष्ट्रे पुढे आली आहेत ती आहेत जपान, रशिया व यूरोपीय राष्ट्रे. या बदलत्या परिस्थितीबद्दल अमेरिकन लोकांस जाणीव होऊ लागली आहे, असे तेथे प्रसिद्ध होणाऱ्या अनेक लेखांवरून कळून येते. त्यांमध्ये आढळणाऱ्या प्रतिक्रियेचा एक नमुना वर उद्धृत केला आहे. परिस्थितीमध्ये जो बदल घडून येत आहे, त्याकरिता अमेरिकेतील परिस्थिती किंवा प्रवृत्ती काही प्रमाणात कारणीभूत होत आहेत, असे अनेक लोकांस वाटते. जपानची लोकसंख्या अमेरिकन लोकसंख्येच्या निम्मी आहे; पण दरवर्षी शिक्षण पूर्ण करून कॉलेजामधून बाहेर पडणाऱ्या जपानी इंजिनीअरांची संख्या अमेरिकन संख्येपेक्षा पाचपटींनी जास्त असते. उच्च गणित विषयाचा अभ्यास करणाऱ्या प्रत्येक विद्यार्थ्यामागे रशियात हा विषय शिकणारे ५० विद्यार्थी असतात. विज्ञान व तंत्रविद्येचा शिक्षणक्रम पुरा करून बाहेर पडणाऱ्या रशियन विद्यार्थ्यांची संख्या इ. स. १९७९ मध्ये जगात सर्वांत जास्त अशी (तेरा लाख एवढी) होती. देशात उपलब्ध असलेल्या तांत्रिक मनुष्यबळाच्या बाबतीत रशियाच्या नंतर अमेरिका व त्यानंतर भारत असा क्रम आढळतो. झटपट शिक्षण आटोपून जीवनातील आनंद उपभोगण्यास सुरुवात करण्याकडे अमेरिकन तरुणांची प्रवृत्ती असल्यामुळे शाळेमध्ये अवघड विषय घेण्याकडे विद्यार्थ्यांचा कल कमी दिसतो. व्हिएटनाम युद्धातील अनुभव, अमेरिकेमधील काही अणुभट्ट्यांच्या अभिकल्पनात व कार्यात आढळलेले दोष, जागतिक अणुयुद्धाची भीती या सर्व घटनांमुळे सामान्य अमेरिकन तरुणाच्या मनात वैफल्याची भावना निर्माण झाली असावी. या सर्व गोष्टी त्याच्या वर उल्लेख केलेल्या प्रवृत्तीला बऱ्याच कारणीभूत असतील, असे मत पण प्रदर्शित करण्यात आले आहे.

जगातील पहिला उपग्रह रशियाने अवकाशात सोडला. मानवासहित आकाशयान प्रथम प्रक्षेपित करण्याचा मान पण रशियानेच मिळविला. विज्ञान व तंत्रविद्येत रशियाने केलेल्या आश्चर्यकारक प्रगतीबद्दल बाहेरील जगातील लोकांस कल्पना नव्हती. त्यामुळे या घटनांमुळे त्यांना एक प्रकारचा धक्काच बसला. या सर्वांमागे रशियामधील विज्ञानविषयक शिक्षणक्रमाचा काहीतरी महत्त्वाचा वाटा

असावा अशी साहजिकच एक कल्पना पुढे आली. या कारणास्तव अमेरिकन भौतिकी विज्ञान अभ्यास समितीचे ( P. S. S. C. ) एक शिष्टमंडळ रशियामध्ये जाऊन त्यांनी तेथील अभ्यासक्रमाचा तपशील, विज्ञान शिकविण्याची पद्धत याकरिता घेतलेले उपकरण-साहाय्य या सर्व गोष्टींचे सखोल निरीक्षण केले.

रशियामधील तांत्रिक व शास्त्रीय विषय शिकविण्याच्या पद्धतीची गुणवत्ता व श्रेणी या दोन्ही उच्च प्रतीच्या आहेत, असे या समितीला आढळून आले. अमेरिकन विज्ञान शिकविण्याच्या पद्धतीत व अभ्यासक्रमात सुधारणा करावयास हवी, तिचे आधुनिकीकरण करावयास पाहिजे, उपकरणे व यंत्रसामग्री यांचा जास्त प्रमाणावर उपयोग करावयास हवा, प्रयोगांना जास्त महत्त्वाचे असे स्थान द्यावयास हवे, असे अनेक निष्कर्ष या समितीने काढले. प्रचलित अभ्यासक्रमात शिकविण्यात येणारी माहिती पुष्कळशा मोठ्या प्रमाणात जुनी, कालबाह्य व संदर्भहीन असते, असे समितीचे मत पडले. सर्वसामान्य विद्यार्थ्यास रस वाटेल किंवा आकर्षण वाटेल असा भाग या अभ्यासक्रमात थोडा आहे. त्यामध्ये माहिती पाठांतरित करण्यावर जास्त भर दिला जातो, असेही मत समितीने पुढे मांडले. शिक्षण व ज्ञानसंचय यांमध्ये एक महत्त्वाचा फरक असतो, याची दखल अभ्यासक्रमात घेतली गेलेली आढळत नव्हती. पुस्तके, नियतकालिके, किंवा विश्वकोश यांमध्ये ज्ञानसंचय असतो. कोणताही प्रश्न असो, त्याबद्दलचे ज्ञान पुस्तकाला असते. पण प्रत्यक्ष जीवनात येणारे प्रश्न सोडविण्याकरिता (पुस्तके वाचून का होईना) निर्णय घेण्याची क्षमता फक्त मनुष्याला ( शिक्षणानेच ) असते. विज्ञानामध्ये माहितीच्या स्वरूपात ज्ञान असणे आवश्यक असते, याबद्दल काही शंका नाही. या प्रक्रियेमुळेच विज्ञानामध्ये ज्ञानसंचय वाढतो व त्यामध्ये प्रगती होत असते, पण त्याबरोबरच स्वतंत्र संशोधकबुद्धीने विचार करण्याची शक्ती ही त्यापेक्षाही आवश्यक असते, हे विसरून चालत नाही.

या सर्व गोष्टी लक्षात घेता विज्ञानविषय शिकविण्याची पद्धत इतर कोणताही विषय शिकविण्याच्या पद्धतीपेक्षा बरीच निराळी असली पाहिजे हा विचार मान्य झाला, तरी तो तितक्या प्रमाणात अमलात आणला जात आहे असे दिसत नाही. तात्त्विक चर्चा व प्रयोगांद्वारे मिळालेल्या माहितीचे संकलन व पाठांतरण यांवरचा जोर अजून कमी झाला आहे असे दिसत नाही. विज्ञानामधील संकल्पना प्रयोगशाळेत अनुभवाने मिळालेल्या ज्ञानावर मूलतः आधारित असतात. कोणतीही संकल्पना शेवटी प्रयोगाच्या निकषावरच तपासून पाहिली जाते. उपकरणे जर नसतील, तर विज्ञानशिक्षणाला प्रयोगाची पुरेशी जोड मिळणार नाही. आणि जर प्रयोग नसतील, तर विज्ञानामधील संकल्पना दृढ रीतीने मनात रुजणार नाहीत. मूलभूत कल्पना सुस्पष्ट व निश्चित नसतील तर त्यांवर पुढची इमारत नीटपणे कशी उभारली जाईल? या सर्व गोष्टी विचारात घेऊन अमेरिकेमधील शालेय व विश्वविद्यालयीन अभ्यासक्रमांमध्ये मोठ्या प्रमाणात सुधारणा करण्यात आली. साध्या स्वस्त साधनसामग्रीचा वापर करून विद्यार्थ्याने प्रयोगास लागणारी अनेक उपकरणे स्वतःच तयार करून त्यांच्या साहाय्याने प्रयोग करण्याची कल्पना या नव्या अभ्यासक्रमात अंतर्भूत करण्यात आली होती. इंग्लंडमध्ये नफिल्ड फौंडेशन या संघटनेच्या द्वारे अशाच प्रकारचे बदल तेथील अभ्यासक्रमात घडवून आणण्याचे काम करण्यात आले. या सर्व घटनांची प्रतिक्रिया भारतामध्ये होऊन गेल्या काही वर्षांत येथील शाळा व कॉलेजे यांच्या अभ्यासक्रमांत जवळ जवळ याच धर्तीवर मोठ्या प्रमाणात बदल करण्यात आले आहेत.

दुसऱ्या महायुद्धकाळापासून व्यवस्थापन अथवा काम करावयाचे विज्ञान हे एक नवीन शास्त्र विकास पावलेले दिसते. विज्ञानाकरिता असलेल्या अभ्यासक्रमात जे बदल सुचविण्यात आले आहेत ते निश्चित करण्यामध्ये अशा शिक्षणतज्ज्ञांचा पण वाटा असावा असे वाटते. कारण अभ्यासक्रमात व शिकविण्याच्या पद्धतीमध्ये सुचविण्यात आलेले सर्वच बदल योग्य झाले आहेत, याबद्दल अमेरिकन वैज्ञानिकांमध्ये एकमत दिसत नाही. भौतिकीमधील नोबेल पारितोषिक विजेते प्रो. ग्लासहौ यांना असे वाटत नाही. त्यांच्या मते पूर्वीच्या काळी वेळोवेळी परीक्षा घेऊन विद्यार्थ्यांनी हस्तगत / आत्मसात केलेले ज्ञान व कौशल्य यांचे मूल्यमापन त्यांना गुण देऊन करण्यात

येत असे. त्यामुळे विद्यार्थ्यांस आपण कोठे चुका करीत आहोत, याचे आकलन होत असे. आज अशा परीक्षा घेणे लोकांना आवडत नाही. अंकगणित किंवा संख्यासंबंधित गणितीय क्रिया यांप्रती सार्वत्रिक विरोध दिसून येतो ( गणितीय कृतीपेक्षा त्यामागील तथाकथित तर्कवादाकडे अधिक लक्ष देणे लोकांना याच कारणामुळे अधिक प्रिय वाटत असावे). इलेक्ट्रॉनीय गणनयंत्रे उपलब्ध झाल्यामुळे या प्रवृत्तीला अधिकच प्रोत्साहन मिळू लागले आहे. आत्मप्रगटीकरण, इतिहास, समाजशास्त्र या विषयांना शिक्षणपद्धतीमध्ये सर्वांत महत्त्वाचे असे स्थान देण्यात येत आहे. गणित व विज्ञान यांना दुय्यम दर्जाचे स्थान दिले जाते. आधुनिक तंत्रविद्येने दूरदर्शन / रेडिओ / चित्रपट यांसारखी अनेक साधने ज्ञानवितरण करण्याकरिता उपलब्ध करून दिली आहेत. यांचा वाढता वापर केला जातो ही गोष्ट योग्यच आहे; पण या साहाय्यक साधनांना वाजवीपेक्षा जास्त महत्त्व दिले जात आहे. काय शिकविले जाते यापेक्षा ते कसे शिकविले जाते यावरच जास्त भर दिला जातो ( Stimulus ) असे वाटते. बाहेरून सतत येणाऱ्या उत्तेजक आदेशांना योग्य असा फक्त प्रतिसाद देण्याची सवय जर विद्यार्थ्यास लागली, तर त्याच्यामध्ये स्वतंत्र व निराळ्या तऱ्हेने विचार करण्याच्या शक्तीचा विकास होणे अवघड दिसते.

अमेरिकेमध्ये निर्माण झालेली परिस्थिती व तीबद्दल तेथील लोकांचे विविध विचार यांचा वर साकल्याने परिचय करून दिला. या सर्व गोष्टींपासून भारतास काय बोध घेता येईल हा प्रश्न येथे उपस्थित होतो. येथे हे प्रथम स्पष्ट केले पाहिजे की, कोणत्याही देशात प्रभावी ठरणारा अभ्यासक्रम त्या त्या देशातील सामान्य जीवनातील तांत्रिक ज्ञानाच्या पातळीवर काही प्रमाणात अवलंबून राहतो. परदेशातील अभ्यासक्रमाची निव्वळ नक्कल केल्यास आपली प्रगती फक्त कागदोपत्री राहण्याचा संभव राहतो. सायन्स टुडे या भारतीय नियतकालिकात आय. आय. टी. मधून उच्च शिक्षण घेऊन बाहेर पडलेल्या विद्यार्थ्याने प्रकट केलेले विचार या संदर्भात उद्बोधक वाटतात. त्याच्या मते भारतामधील विज्ञानविषयक अभ्यासक्रम वास्तववादी नाहीत. सभोवतालच्या जगात उपलब्ध असलेल्या तंत्रविद्यांशी या अभ्यासक्रमाचा संबंध दिसत नाही. उदा., भौतिकीमध्ये सायक्लोट्रॉन, अणुभटी इ. गोष्टींबद्दल दीर्घ मीमांसा व विवेचन सापडते; पण यांपैकी कोणत्याही गोष्टीचा प्रत्यक्ष अनुभव विद्यार्थ्यांस तर नसतोच; पण बहुसंख्य शिक्षकांस पण नसतो. त्यामुळे या ज्ञानाचे स्वरूप अमूर्त व अवास्तववादी होते, असा निष्कर्ष त्याने काढला आहे. भौतिकीमधील सर्व महत्त्वाच्या संकल्पना किंवा तंत्रे यांचे दिग्दर्शन प्रत्यक्ष प्रयोगाच्या द्वारे करण्यात यावे या तत्त्वाबद्दल कोणाचेही दुमत असावयाचे कारण नाही. व्यवहाराच्या दृष्टीने पाहता देशातील किती शाळा-कॉलेजांमध्ये ते प्रत्यक्ष अमलात आणणे शक्य होईल या प्रश्नाचे उत्तर देणे सोपे नाही. या दृष्टीने पाहता वरील तर्कवाद संपूर्णपणे बरोबर नसला, तरी त्यामुळे सध्याच्या अभ्यासक्रमात काय उणिवा आहेत, याचे दर्शन घडते याबद्दल शंका नाही.

अभ्यासक्रमात जरी सुधारणा केल्या, तरी हे अभ्यासक्रम शिकविण्याकरिता प्रशिक्षित शिक्षक उपलब्ध असणे ही तितकीच महत्त्वाची अशी गोष्ट असते. या बाबतीत अनेक पुढारलेल्या देशांत पुच्छप्रगतीच झालेली दिसते. उदा., अमेरिकेमधील गणितविषयाच्या शिक्षकांची संख्या गेल्या दहा वर्षांत ७७ टक्क्यांनी घटली, तर विज्ञानविषय शिकविणाऱ्या शिक्षकांच्या बाबतीत ही घट ६५ टक्के इतकी झाली आहे, असे आढळते ( News Week 21–2–83 पा. ५५). प्रचलित शिक्षकांपैकी ३०% शिक्षकांना योग्य प्रशिक्षण मिळालेले नाही. अमेरिकेतील ५० राज्यांपैकी ४२ राज्यांतील शाळांमध्ये पुरेसे शिक्षकच नाहीत. या परिस्थितीला तोंड देण्याकरिता खालील उपाययोजना हाताळल्या गेल्या आहेत. काही ठिकाणी इंग्रजी, संगीत किंवा समाजशास्त्र विषयांचे शिक्षण घेतलेल्या शिक्षकांस १४ आठवड्यांचे विज्ञानशिक्षण घेऊन, त्यांस त्यानंतर विज्ञानविषय शिकविण्यास सांगण्यात येत आहे. अशा प्रकारे शिक्षण घेतलेल्या शिक्षकांना अणू व रेणू यांमध्ये काय भेद आहे याचेसुद्धा नीट आकलन झालेले दिसत नाही, असे मत प्रदर्शित करण्यात आले आहे. हे जर खरे असेल तर हे शिक्षक काय पातळीचे विज्ञान शिकवीत असतील, याविषयी कल्पनाच केलेली बरी. नव्या पिढीचे ज्ञान उथळ

व जुजबी स्वरूपाचे असते, असा आरोप मागील पिढीचे लोक नेहेमीच करीत असतात. पण इंग्लंड-मध्ये जी पाहणी घेण्यात आली, तीवरून या टीकेमध्ये तथ्य असावे, हे दर्शविणारा पुरावा उपलब्ध झाला आहे. १३ वर्षाच्या विद्यार्थ्यांकरिता आयोजित केलेल्या बुद्धिचाचणीच्या परीक्षांमध्ये नव्या शिक्षकांपैकी अर्धे लोक उत्तीर्ण होऊ शकले नाहीत, असे या पाहणीमध्ये आढळले ( New Scientist 10-8-1978 पा. 427 ). या पाहणीमध्ये आणखी असे सापडले की, सध्याच्या सतरा वर्षाच्या विद्यार्थ्यास असणारे विज्ञानाचे ज्ञान त्याच वयोगटातील १९६०, १९७० या सालच्या विद्यार्थ्यापेक्षा बरेच कमी असते.

विज्ञानविषय शिकविण्याकरिता ज्या योजना प्रत्यक्ष अमलात आहेत किंवा ज्या सुचविल्या जात आहेत, त्या उल्लेखनीय वाटतात. विज्ञानशाखेत उच्च शिक्षण घेणाऱ्या विश्वविद्यालयीन विद्यार्थ्यांना (त्यांना पदवी मिळण्याच्या आधीच) भौतिकी व रसायनशास्त्र यांमधील विषयांवर अल्पकालीन अभ्यासक्रम घेण्याकरिता बोलावले जाते. हे कार्य करण्याबद्दल त्यांना त्यांचे उच्च शिक्षण पुरे करण्याकरिता कर्ज देण्यात येते. काही परिस्थितीमध्ये या कर्जाचा काही भाग माफ करण्यात येतो. उद्योगधंदे व संशोधनसंस्था यांमध्ये वैज्ञानिक व तंत्रज्ञ यांना जास्त वेतन मिळू शकते. परत या क्षेत्रात आपली आर्थिक उन्नती करून घेण्याची जास्त संधी मिळत असते. विज्ञानविषय शिकविणाऱ्या शिक्षकांना जास्त वेतन व समाजात जास्त मानाचे स्थान मिळवून देण्याच्या उद्देशाने दोन सूचना करण्यात आल्या आहेत. अशा शिक्षकांना उद्योगधंद्यांत अल्पकालीन नोकरी देवविण्याची सक्ती सरकारने करावी अशी यांपैकी पहिली सूचना आहे. नाही तर शिक्षणक्षेत्रातून जे लोक उद्योगधंद्यात जातील, त्यांवर काही काळ (योग्य मोबदला घेऊन) शाळा-कॉलेजात शिकविण्याची सक्ती करावी अशी दुसरी सूचना करण्यात आली आहे.

चलनफुगवटा व वाढते जीवनमान यांचा परिणाम शैक्षणिक क्षेत्रावरसुद्धा झाल्यावाचून राहिला नाही. शाळा-कॉलेजांमधील फीचे प्रमाण वाढत चालले आहे. त्यामुळे हे शिक्षण घेणे आर्थिक दृष्टया पाहता दिवसेंदिवस कठीणच होत जाणार आहे. अमेरिकेसारख्या पुढारलेल्या व संपन्न राष्ट्रांमध्येसुद्धा या गोष्टीची जाणीव होऊ लागली आहे. अमेरिकन कॉलेजे व विश्वविद्यालये यांमध्ये अनेक शिष्यवृत्त्या उपलब्ध असतात. फावल्या वेळात काम करून अर्थाजन करण्याची सोय तेथील विद्यार्थ्यांकरिता उपलब्ध असते. शाळेत आकारल्या जाणाऱ्या फिया कॉलेजमध्ये द्याव्या लागणाऱ्या फियांपेक्षा निश्चितच कमी असणार; पण या योजना शाळेतील विद्यार्थ्यांकरिता देखील पुऱ्या पडत नाहीत, असा अनुभव येऊ लागला आहे. अमेरिकेमधील कॅथॉलिक शाळांनी या अडचणीवर उपाय म्हणून एक अभिनव योजना अमलात आणली आहे तीविषयीची माहिती आपल्याला कुतूहलजनक वाटेल (टाईम २९-३-१९८२) : शाळांमधून शिक्षण-फी म्हणून प्रत्येक विद्यार्थ्याकडून ८४० डॉलर्स घेतले जात असत. पण प्रत्येक विद्यार्थ्यामागे होणारा प्रत्यक्ष खर्च १४०० डॉलर्स एवढा असे. शाळेत शिकणाऱ्या विद्यार्थ्यांची एकंदर संख्या वाढली, तर प्रत्येक विद्यार्थ्यामागे होणाऱ्या प्रत्यक्ष खर्चाचे प्रमाण कमी होत जाईल हे समजण्यासारखे आहे. चलनफुगवटा व वाढती बेरोजगारी यांमुळे ८४० डॉलर्स फी देण्याची कुवत असलेल्या पालकांच्या संख्येत घट होत गेल्यामुळे शाळेत येणाऱ्या विद्यार्थ्यांची संख्या कमी होत गेली. परिणामी शाळेच्या आर्थिक अंदाजपत्रकात समतोल संभाळणे कठीण होऊ लागले. म्हणून त्यांनी "तुम्ही जेवढी फी देऊ शकता, तेवढी फी द्या" ही योजना अमलात आणली. काही पालकांनी (१२%) सबंध १४०० डॉलर्स फी देण्याचे कबूल केले, तर बाकीच्यांनी आपआपल्या कुवतीप्रमाणे या खर्चाचा वाटा उचलावयाची तयारी दाखविली. या योजनेचा असा परिणाम झाला की, शाळेतील विद्यार्थ्यांची संख्या सुमारे ४५ टक्क्यांनी वाढली, तर शाळेचे उत्पन्न २० टक्क्यांनी वाढले. भारतामध्ये जर अशी काही योजना अमलात आणली, तर येथील लोक त्याचा गैरफायदा घेतील; शाळेचे वाढलेले उत्पन्न शाळेवरच खर्च होईल, याची हमी देणे अवघड असेल. आणि या योजनेत स्वेच्छेने जास्त फी देण्याचा जो भाग आहे त्याची परिणती सर्वांकडून ही अतिरिक्त रक्कम सक्तीने वसूल केली जाईल अशी

भीती प्रदर्शित केली जाईल. यामधील सत्य गोष्ट गोष्ट अशी की, जगामध्ये अशी कोणतीच प्रणाली किंवा योजना नाही की, जिचा गैरफायदा घेता येत नाही. ज्या देशात सर्वसाधारण नीतिमत्तेचा दर्जा इतका खाली आला आहे की, ज्यामध्ये अशा योजना कार्यान्वित करणे शक्य असणार नाही त्या देशाचे भवितव्य दुःखदायक असेल, असे ठाम भविष्य करता येते.

अमेरिकेत शिक्षणपद्धतीमध्ये अनेक सुधारणा केल्या गेल्या तरी असिनोव्ह यांच्या मताप्रमाणे अमेरिकन शाळांमधून उपकरणे व सामग्री यांबाबतीत अजून कमतरताच आहे. तेथील तंत्रज्ञांच्या संख्येत दरवर्षी पडणारी भर पण पुरेशी नाही. शाळांमधील उपकरण–सामग्रीमधील कमतरता भरून काढण्याकरिता मोठ्या प्रमाणात भांडवली गुंतवणूक करावी लागेल. हे प्रत्यक्षात घडेल की नाही याबद्दल अनेक लोकांना शंका वाटते. कोणतीही राजकीय सत्ता संरक्षणयोजनेवर वाटेल तेवढा पैसा खर्च करण्यास एक वेळ तयार होईल; पण त्याचा काही अंशसुद्धा विज्ञान व तंत्रविद्या यांच्या शिक्षणाकरिता किंवा प्रसाराकरिता खर्च करण्यास नाखूष असते. आधुनिक काळात तंत्रविद्येचे शिक्षण घेऊन तयार झालेली कोणत्याही राष्ट्रामधील लोकसंख्या ही तेथील संरक्षणकार्यक्रमाचे एक अंग असते ही गोष्ट सत्ताधाऱ्यांच्या लक्षात येण्यामध्ये काहीतरी अडचण पडत असावी. जगापुढे सध्या ज्या समस्या आहेत किंवा जे प्रश्न उभे आहेत, त्यांमधील मोठा भाग तांत्रिक स्वरूपाचा असतो आणि हे प्रश्न हाताळण्याकरिता ज्यांच्यासमोर येतात त्या सत्ताधारी लोकांमध्ये कायदा व मानव्य या विषयांचेच शिक्षण घेतलेले लोक बहुसंख्य असतात. त्यामुळे अशी परिस्थिती निर्माण होत असावी, असे एका शास्त्रज्ञाचे मत आहे. विज्ञान व तंत्रविद्या यांकडे पुरेसे लक्ष न दिल्यास जगामध्ये एक अंधारयुग येण्याची भीती शास्त्रज्ञांना वाटत असते; तर लोकांत स्वार्थ, अनीती व व्यापारी वृत्ती बोकाळल्यामुळे ते येईल असे मॅकइनटायर या तत्त्वज्ञान्यांस वाटते. रानटी टोळ्यांनी रोमन साम्राज्याचा नाश केल्यामुळे मागील मध्ययुगीन अंधारयुग आले, असे मानले जाते. मॅकइनटायर यांच्या मते या वेळी रानटी लोक बाहेरून येण्याची आवश्यकता नाही; कारण ते आपल्यातच असून गेली काही वर्षे आपल्यावर राज्य करीत आहेत.

अशा परिस्थितीत लोकांनी काही तरी करण्याची वेळ आली आहे असे असिमोव्ह यांस वाटते. ऐतिहासिक दृष्टया विचार केल्यास, विज्ञानाचा विकास त्यामध्ये रस घेणाऱ्या हौशी लोकांनी छंद म्हणून केला. विज्ञानाची सुरुवात गॅलिलीओने तयार केलेल्या दुर्बिणीपासूनच झाली असे म्हणता येते. अवकाशातील ग्रह व तारे यांचे निरीक्षण करून मानवी जीवन किती क्षुद्र आहे याचा अनुभव अवश्य येत असेल; पण आजच्या काळातील विज्ञानामधील संकल्पनांचे ज्ञान करून घेण्यामध्ये त्याचा कितपत उपयोग होत असतो हा प्रश्न वादातीत नाही. एक काळ असा होता की, शाळांमध्ये दुर्बिणी किंवा प्लॅनेटेरियमद्वारा ग्रहगतीचे दर्शन यावर विशेष भर दिला जात होता. छंद म्हणून विद्यार्थ्यांना दुर्बिणी तयार करण्यासाठी प्रोत्साहन देण्यात येत होते. आजचे युग इलेक्ट्रॉनिकीचे आहे व त्यामुळे आपल्या दृष्टिकोनात आपण तद्नुरूप बदल करावयास हवा, याची जाणीव सर्वत्र झालेली दिसत नाही.

प्रो. वीनर यांच्या मताप्रमाणे सध्याची इलेक्ट्रॉनीय क्रांती ही पूर्वीच्या औद्योगिक क्रांतीपेक्षा जास्त महत्त्वाची अशी आहे. पहिल्या औद्योगिक क्रांतीमध्ये मानव किंवा जनावरे यांच्या स्नायूबळाऐवजी निरनिराळ्या प्रकारच्या इंजिनांचा वापर होऊ लागला. इंजिनाचे नियंत्रण अथवा उपयोजन करण्याकरिता मनुष्याच्या बुद्धीचा किंवा निर्णयशक्तीचा वापर केला जात होता. इलेक्ट्रॉनीय यंत्रामुळे मनुष्यास नवे ऊर्जा-उद्गम हस्तगत झाले नाहीत, तर त्याला सापडलेल्या उद्गमांवर (उदा., अणुऊर्जा) प्रभावीपणे नियंत्रण करण्याची क्षमता त्यास प्राप्त झाली आहे. नियंत्रण करण्याचे काम सध्याची इलेक्ट्रॉनीय यंत्रे वाढत्या प्रमाणात करू लागली आहेत. मानवी नियंत्रणावर ज्या मर्यादा होत्या त्यासुद्धा या यंत्रांमध्ये आढळत नाहीत. ही नियंत्रक यंत्रे कधी झोपत नाहीत, आजारी पडत नाहीत, दारू पिऊन बेहोष पण होत नाहीत. ती थकत नाहीत किंवा कामचुकार मनुष्याप्रमाणे वारंवार चुका पण करत नाहीत. या यंत्रांमुळे मनुष्याच्या

पंचेंद्रियांच्या कार्यक्षमतेत आश्चर्यजनक वाढ झाली आहे. साध्या कानांनी जे ऐकू येणार नाही ते याच्या साहाय्याने आपण ऐकू शकतो. जे डोळ्यांनी पाहता येणार नाही त्याचे अवलोकन करू शकतो. जी गणितीय कृत्ये करण्यास एखाद्या मनुष्यास आपला संबंध जन्म घालवावा लागला असता, अशी कामे या यंत्रांच्या साहाय्याने आपण आज काही तासांतच पूर्ण करू शकतो. काही तज्ज्ञांच्या मते इलेक्ट्रॉनीय उपकरणांच्या कार्यक्षेत्रावर काही मर्यादा दिसत नाहीत. त्यामुळे यंत्र बनविणाऱ्या मनुष्यापेक्षा जास्त बुद्धिवान असे इलेक्ट्रॉनीय यंत्र तयार करण्याची कल्पना अशक्य वाटत नाही.

सध्याच्या पिढीतील मुले इलेक्ट्रॉनिक उपकरणे व खेळ यांच्या वातावरणात वाढत असतात. त्यामुळे त्यांना या विषयातील काही ज्ञान आपोआपच मिळत असते. लहान लहान वयाची मुले दूरदर्शन संचाचा वापर करू शकतात. घरातील हाय-फाय-ध्वनि-मुद्रिका यंत्राचा उपयोग करू शकतात. या उपकरणांतील अनुयोजनप्रणालीविषयी त्यांना माहिती असते. एच. एस. झिम यांनी अमेरिकेतील विद्यार्थ्यांस कोणत्या गोष्टींमध्ये विशेष रस वाटतो, याचा अंदाज घेण्याकरिता एक पाहणी केली. तीमध्ये त्यांना रेडिओ उपकरणे व ती कसे कार्य करतात यांविषयी विशेष आकर्षण वाटते, असे आढळून आले. या प्रवृत्तीमुळे त्यांच्या मानसात बदल घडून आला आहे. त्यांच्या विचारांच्या आकृतिबंधात फरक पडला आहे, असे दिसते. त्यांना वाचावयास आवडणाऱ्या गोष्टींचे स्वरूप पण पूर्वीसारखे राहिले नाही. अवकाशयान, जेट विमाने, अणुभट्टी यांविषयी त्यांना आजच्या काळात जास्त कुतूहल आहे, असे दिसते.

उद्योगधंद्यात पुढील कालखंडात इलेक्ट्रॉनिकीचा वाढता वापर होत जाणार. आपल्या घरात असणाऱ्या इलेक्ट्रॉनीय उपकरणांच्या संख्येत पण भर पडत जाणार आहे. अशा परिस्थितीत विद्यार्थ्यांना या इलेक्ट्रॉनिकी युगात जगता यावे याकरिता या विषयावर शिक्षणक्रमात व छंद म्हणून भर दिला पाहिजे, हे उघड आहे. या प्रश्नाला एक व्यावहारिक बाजू पण आहे. इलेक्ट्रॉनीय उपकरणांचा करमणूक, शिक्षणक्षेत्र, व्यापारी व संरक्षणक्षेत्रात वाढता वापर लक्षात घेता इलेक्ट्रॉनीय सामग्री व उपकरणे तयार करण्याकरिता, ती नीट काम देत राहतील याची काळजी घेण्याकरिता किंवा त्यांमध्ये जर काही दोष निर्माण झाला, तर त्याची दुरुस्ती करण्याकरिता; फार मोठ्या संख्येत तंत्रज्ञ लागणार आहेत. ही नवी परिस्थिती पालक व विद्यार्थी या दोघांच्या नजरेस आणून देणे आवश्यक आहे. इलेक्ट्रॉनीय उपकरणांचा कौशल्य व ज्ञान यांसह वापर करता येणे हा या शिक्षणाचा एक भाग असल्यामुळे या विषयाचे शिक्षण सहा वर्षांच्या विद्यार्थ्यापासून सुरू करता यावे असे मत प्रदर्शित केले गेले आहे. या छंदाला शैक्षणिक दृष्टीने पाहतासुद्धा महत्त्व आहे. कारण मुलाला आपल्या हाताने काहीतरी निर्माण केल्याचा आनंद मिळू शकतो आणि या प्रयत्नामध्ये त्याला स्वतंत्रपणे विचार करण्याची, व्यावहारिक समस्यांना तोंड देण्याची व त्यांमध्ये निर्णय घेण्याची सवय पण लागते. आपल्या पाल्याने इंजिनीयर, डॉक्टर किंवा वकील यांपैकी कोणत्यातरी व्यवसायाची निवड करावी या पलीकडे भारतामधील बहुसंख्य पालकांची दृष्टी जाऊ शकत नाही, असे आज आढळते. म्हणून आजच्या जगात इलेक्ट्रॉनिकीचे काय महत्त्व आहे, याविषयी वर दिलेले थोडे विवेचन केले आहे.

एके काळी अमेरिकेमध्ये इलेक्ट्रॉनिकीचा छंद मोठ्या प्रमाणात अनुसरलेला दिसत होता. तेथे मर्यादित क्षेत्रात प्रक्षेपण करणारी खाजगी रेडिओ-स्थानके होती. या छंदामुळे हजारो इलेक्ट्रॉनीय तंत्रज्ञ (शाळा व कॉलेज यांच्या कक्षेबाहेर) स्वतःच शिकून तयार होत असत. इ. स. १९६३ साली काही कारणांकरिता अशा खाजगी प्रक्षेपणकेंद्रांवर तेथील शासनाने निर्बंध घातले. या वेळेपासून अमेरिकेमध्ये इलेक्ट्रॉनीय तंत्रज्ञांच्या संख्येत सारखी घट होत गेली. याचा परिणाम शेवटी अमेरिकेमधील या उद्योगधंद्यावर होऊन त्यांना जपानी कंपन्यांशी चढाओढ करणे कठीण होऊन बसले आहे.

अमेरिकेमध्ये निर्माण झालेले प्रश्न व ते सोडविण्याकरिता सुचविले गेलेले विविध उपाय यांचा साकल्याने वर परिचय करून दिला. या सर्व गोष्टींपासून भारतास काय बोध घेता येईल, हा प्रश्न आपल्यापुढे येतो. आपणास इलेक्ट्रॉनीकीचा विद्यार्थी-

करिता मोठ्या प्रमाणात छंद म्हणून प्रसार करता येईल का ? इलेक्ट्रॉनीय प्रयोगांना लागणारे घटक किंवा उपकरणे विशेष महाग नसतात. ते कार्यान्वित करण्याकरिता लागणारे तांत्रिक ज्ञान पण क्लिष्ट स्वरूपाचे नसते. ते सामान्य विद्यार्थ्यांच्या आवाक्यात येण्यासारखे आहे. आज आपल्या देशात चर्चासत्रे व व्याख्याने यांना काही तोटा नाही. प्रयोगशाळेत काहीतरी करून दाखवण्याकडे प्रवृत्ती कमी दिसते.

आज शाळा-कॉलेजांनी दुर्बिणी विकत घेण्याकरिता सहस्रावधी रुपये खर्च न करता त्याच धनाचा उपयोग आपल्या विद्यार्थ्यांकरिता यांत्रिकी व इलेक्ट्रॉनीय यंत्रशाळा सुसज्ज करण्याकरिता करावा, असे मत पुढे मांडावेसे वाटते. अशा छंदापासून विद्यार्थ्यांना जे ज्ञान मिळेल ते आधुनिक असेल, त्याला व्यवहारी जगात किंमत असेल व प्रत्यक्ष दैनंदिन जीवनात संदर्भ असेल.

भारतीय मनाला अमूर्त कल्पनांचे विशेष आकर्षण असते; पण या कल्पना प्रत्यक्षात उतरविण्याकरिता जी क्षमता लागते तिचा त्यामध्ये अभाव आहे, असे मत नाकामुरा या जपानी विचारवंताने पुढे मांडले आहे, त्याची या संदर्भात आठवण होते. या आक्षेपामध्ये कदाचित थोडे तथ्य असावे, असे दर्शविणाऱ्या काही घटना मी पाहिल्या आहेत, त्यांचा उल्लेख करतो. विज्ञानविषयक ज्ञान हे निव्वळ पुस्तकी स्वरूपाचे नसावे. विद्यार्थ्यांना हातांनी काही तरी प्रत्यक्ष करून दाखविण्याकरिता प्रोत्साहन मिळावे या सद्हेतूने काही वर्षांपूर्वी केंद्र सरकारने काही तज्ज्ञ लोकांची नेमणूक खास या कार्याकरिता केली. कवठाचे फळ कोरून त्याचा उपयोग करून मानवाने सुमारे दोन हजार वर्षांपूर्वी शोधून काढलेली पाण्याची कारंजी कशी करावयाची हे या प्रयोगामध्ये विद्यार्थ्यांस शिकविले गेले. दुसरी हकीगत अशाच प्रकारची आहे. मुंबईमधील एका विभागातील भगिनी-समाजाला एके काळी विज्ञानाविषयी पुष्कळ कुतूहल निर्माण झाले. आजकाल स्वयंपाकघरात अनेक विद्युत / यांत्रिक साधने वापरली जातात. त्यांचा योग्य असा वापर कसा करावा, त्यांची काळजी कशी घ्यावी, त्यांच्या कार्यामागे कोणती तत्त्वे असतात या विषयी भगिनींना जिज्ञासा वाटेल असा कोणीही अंदाज केला असता; पण त्यांनी ज्या विषयांवर व्याख्याने आयोजित केली त्यांमध्ये अणुभट्टी, अवकाशयान यांसारख्या अद्ययावत विषयांचाच फक्त समावेश केला होता. ही अवास्तववादी प्रवृत्ती निरनिराळ्या स्वरूपांत सर्वत्र दिसते. आपल्याला जर विज्ञान व तंत्रविद्या यांमध्ये प्रगती करावयाची असेल तर या प्रवृत्तीला मुरड घालण्याकरिता प्रयास केले पाहिजेत. विज्ञान जेव्हा सामान्य मनुष्यापर्यंत पोहोचवले जाते, तेव्हा त्याचे तंत्रविद्येत रूपांतरण होण्यास मदत होते. आपल्या देशात प्राचीन काळापासून हस्तकुशल कारागिरांची परंपरा आहे; आपल्याकडे बुद्धिमान लोकांचे प्रमाण पण कमी नाही. हे दोन घटक एकमेकांपासून दूर राहिल्यामुळे मध्ययुगीन काळात या देशात विज्ञान व तंत्रविद्या यांमध्ये प्रगती होऊ शकली नाही. आज हे दोन घटक एकमेकांशी निश्चयपूर्वक सहकार्य करतील, तर देशाची उन्नती होण्यास वेळ लागणार नाही, असे वाटते. बदलत्या परिस्थितीशी जुळवून घेण्याची क्षमता हिंदी लोकांमध्ये प्रकर्षाने आढळते. या क्षमतेचा उपयोग करून ते विसाव्या शतकातील नव्या परिस्थितीला अनुरूप असे परिवर्तन आपल्या लोकमानसात घडवून आणतील, याविषयी विश्वास वाटतो.

---

# १९८२ च्या भारतीय ज्ञानपीठ पुरस्कार विजेत्या

# महादेवी वर्मा

पद्‌मजा घोरपडे

हिंदी काव्येतिहासामध्ये सन १९२० ते सन १९३० हा कालखंड 'छायावाद' या नावाने ओळखला जातो. हिंदी साहित्यात मोलाची भर टाकणारे चार श्रेष्ठ कवी– जयशंकर प्रसाद, सुमित्रानंदन पंत, सूर्यकांत त्रिपाठी 'निराला' व महादेवी वर्मा यांच्या तेजोवलयांनी व्याप्त असा हा कालखंड अनेक वैशिष्टचांमुळे महत्त्वपूर्ण मानला जातो. या सर्वांत महादेवींचे स्थान जरा वेगळे आणि म्हणूनच आकर्षित करून घेणारे आहे. त्यांच्या गद्य आणि पद्य साहित्यांत त्यांची दोन वेगवेगळी रूपे स्पष्टपणे आपल्याला पाहायला मिळतात. काव्यात त्यांची भूमिका सुरवातीपासून शेवटपर्यंत विरहिणी भारतीय स्त्रीची आहे. ही विरहिणी विरहाच्या दहा अवस्थांपर्यंत जाऊन चमत्कृती निर्माण करणारी प्राचीन काव्यातील नायिका नक्कीच नाही. त्यांच्या संपूर्ण काव्यसाधनेचा गाभा लौकिक प्रेमभावनेची अलौकिक प्रेमभावनेत परिणती हा आहे. प्रेमाचे हे उदात्तीकरण अतिरेकी कोटीतले वाटत नाही. या उदात्तीकरणाला मानसशास्त्रीय बैठक आहे. त्यांच्या संपूर्ण साहित्यसाधनेवर दृष्टिक्षेप टाकला, की त्यांच्या सुसंस्कृत व संतुलित स्त्री-मनाची प्रतीती आल्याशिवाय राहत नाही. काव्यात अंतर्मुख होऊन स्वतः-बद्दल विचार करणाऱ्या महादेवींचे बहिर्मुखी आणि समाजोन्मुख व्यक्तिमत्त्व त्यांच्या गद्य रचनेत पाहायला मिळते. रेखाचित्रे व निबंध यांमध्ये उपेक्षितांबद्दल कळकळीने कार्य करणाऱ्या, नारीशोषणासारख्या कृत्यांना वाचा फोडणाऱ्या जागृत व सक्रीय साहित्यिकेच्या रूपात त्या आपल्या समोर येतात. मैत्रिणीच्या रूपातून त्यांनी व्यक्त केलेली सहानुभूती व कळकळ, वात्सल्यभावनेचा मुक्त वर्षाव आणि जबाबदार व्यक्तीची सतर्क, आपुलकीची दृष्टी व जिव्हाळा या सर्वांचे दर्शन महादेवींच्या गद्य साहित्यात होते.

संवत १९६४ मध्ये होळी शुभ-पर्वाच्या दिवशी त्यांचा जन्म उत्तरप्रदेशमधील फरुर्खाबाद येथे झाला. आई-वडिलांचे पहिलेच अपत्य आणि तेसुद्धा दीर्घ प्रतीक्षेनंतर लाभलेले. म्हणूनच कुलदेवी दुर्गामातेची कृपा समजून बालिकेचे नाव महादेवी असे ठेवण्यात आले. आई-वडिल व घरातील अन्य व्यक्तींकडून लहानपणीच त्यांना श्रेष्ठ वाङ्‌मयीन गुणांचा व उत्कृष्ट चित्रकलेचा वारसा मिळाला. त्यांचे वडील श्री. गोविंदप्रसाद भागलपुरच्या महाविद्यालयाचे प्राचार्य होते व आई विदुषी होत्या. लहानपणी घरीच त्यांच्या शिक्षणाला प्रारंभ झाला. त्यांना शिकविण्यासाठी मौलवी, पंडित, संगीतशिक्षक व चित्रकलेचे शिक्षक घरी येत. आईकडून मीराबाई व तुलसीदासांच्या पदांची ओळख महादेवींना झाली. आई व काकू हळदी-कुंकवांच्या रेघांनी रांगोळचा काढीत व ही बालिका त्यांचे अनुकरण करी. हीच त्यांच्या चित्रकलेची सुरुवात ठरली. पुढे महादेवींच्या शिक्षणाचा प्रारंभ इंदौरच्या मिशन स्कूलमध्ये झाला. सन १९१६ मध्ये स्वरूपनारायण वर्मांबरोबर त्यांचा विवाह झाला. पण हा विवाह आपल्या व्यक्तिमत्त्व–विकासास बाधक ठरत आहे हे वारंवार त्यांना जाणवू लागले. याची परिणती पुढे विवाह-विच्छेदात झाली. प्रगतिशील विचारांच्या त्यांच्या वडिलांनी कन्येची इच्छा असल्यास तिचा पुर्नविवाह करून देण्याची तयारी दर्शविली. यासाठी धर्मपरिवर्तन करण्याचेही त्यांनी ठरविले. पण महादेवींनी स्पष्ट नकार दिला. बौद्ध तत्त्वज्ञानाविषयी त्यांना अतोनात आकर्षण होते. बौद्धभिक्षुणी बनण्याचाही त्यांचा मानस होता. एकदा एका बोद्धभिक्षूच्या भेटी-







साठी त्या गेल्या असता त्याने महादेवींशी पडद्याच्या आडून बोलण्यास सुरवात केली. हा स्त्रीचा अपमान किंवा स्त्रीवर दाखविलेला अविश्वास आहे असे त्यांना वाटले. या घटनेमुळे त्यांचे मतपरिवर्तन झाले. १९३२ मध्ये प्रयाग विश्वविद्यालयातून संस्कृत विषय घेऊन त्या एम्. ए. झाल्या आणि लगेच प्रयाग महिला विद्यापीठात प्राचार्या म्हणून त्यांची नियुक्ती झाली. वेतन न घेता त्यांनी 'चाँद' मासिकाचे संपादकत्वही संभाळले. बालपणीच महादेवी व्रज भाषेत कविता करू लागल्या. शब्दांची जुळवाजुळव, छंद, अलंकार इ. ची योजना याबाबत विचारही त्यांच्या मनात घोळत. एके ठिकाणी त्यांनी म्हटले आहे, आकाशातील चंद्र, तारे हे आपल्यापेक्षा फार मोठे आहेत हे वारंवार वडिलधाऱ्या माणसांकडून ऐकले होते. तरीसुद्धा मी त्यांना खेळण्यासाठी बोलवीत असे. रात्रीच्या वेळी अंगणात बसून आकाशाचे निरीक्षण करताना मग शब्दांची जुळवाजुळव करून कवितेच्या स्वरूपात चंद्र-तारे यांना येण्याबद्दल विनंती केली जाई. वयाच्या तेराव्या वर्षी खडीबोली हिंदीत त्यांनी रचलेली 'दिया' ही कविता त्यांच्या परिपक्व बुद्धीची ग्वाही देते. या कवितेच्या काही ओळी पहा—

"धूलि के जिन लघुकणों में है न आभा का प्राण
तू हमारी ही तरह उनसे हुआ वपुमान...
तेल में भी है न आभाका कहीं आभास,
मिल गये सब तब दिया तूने असीम प्रकाश"

धूळ, तेल इ. वस्तूंत तर प्रकाश नाही. परंतु त्या जेव्हा एकत्र येतात तेव्हा दिवा प्रकाश देऊ शकतो. यातील गंभीर भाव आणि यात व्यक्त झालेल्या विचारांमागील तत्त्वज्ञानाची बैठक हा कौतुकास्पद भाग आहे.

त्यांचे काव्यसंग्रह 'नीहार' (सन १९३०), 'रश्मि' (१९३२), 'नीरजा' (१९३४) व 'सांध्यगीत' (१९३६) यांचा मिळून बनलेला 'यामा' हा काव्यसंग्रह १९८२ च्या भारतीय ज्ञानपीठ पारितोषिकाचा मानकरी ठरला. 'सप्तपर्णा' (१९७०) या त्यांच्या काव्यसंग्रहात ऋग्वेद, अथर्ववेद, सामवेद, वैदिक साहित्य व वाल्मीकी, अश्वघोष, कालिदास, भवभूती, जयदेव इ. च्या उक्तींचे हिंदी रूपांतर आहे. याला ६० पानांची विस्तृत प्रस्तावनाही आहे. कवी पंतांच्या षष्टचब्दीपूर्ती समारोहप्रसंगी हा संग्रह पंतांना अर्पण करण्यात आला. 'हिमालय' हाही त्यांचा संपादित काव्यसंग्रह. १९६३ मधील चिनी आक्रमणाच्या वेळी भारतीयांना जागृत करण्याच्या उद्देशाने अनेक कवींच्या कवितांचे हे संकलन त्यांनी तयार केले. 'संधिनी' या त्यांच्या काव्यसंग्रहाची विस्तृत प्रस्तावनाही अनेक दृष्टींनी महत्त्वपूर्ण आहे. काव्याइतकेच त्यांचे गद्य साहित्यही विपुल आणि समृद्ध आहे. 'अतीत के चलचित्र' (१९४१), 'स्मृति की रेखाएँ' (१९४३), 'मेरा परिवार' (१९७४) हे रेखाचित्रांचे संग्रह, 'पथ के साथी' (१९५६) हा संस्मरण संग्रह आणि 'शृंखला की कड़ियाँ' (१९४२), 'क्षणदा' (१९५६)व 'साहित्यकार की आस्था तथा अन्य निबंध' (१९६२) हे निबंधसंग्रहही हिंदी साहित्यात मोलाची भर टाकणारे आहेत.

महादेवींनी आपल्या इच्छाशक्तीने व सुस्वभावाने अवती-भोवतीच्या जगतातील सर्वांना आपल्या कुटुंबातील सदस्य बनविले आणि आयुष्यभर कुटुंबातील या नानाविध सदस्यांकडून त्यांना इतके प्रेम मिळत राहिले आहे की, पाहणाऱ्यालाही त्यांच्या या भाग्याचा हेवा वाटावा. या कुटुंबात प्राणी, पक्षी वगैरेंपासून उपेक्षित-दुर्लक्षित व्यक्तींपर्यंत सर्वांचा समावेश झाला आहे. 'अतित के चलचित्र' मधील पात्रे— रामा, भाभी, बिंदा, साबिया, बिट्टो, घीसा, आलोपीदीन, बदलू, राधिया व छलमा— कोणी महत्त्वपूर्ण किंवा प्रतिष्ठित व्यक्ती नाहीत. एखाद्या कोपऱ्यात मळकटलेले फडके पडलेले असावे असेच काहीसे या पात्रांचे जीवन! पण मायेच्या ओलाव्याने आणि सहानुभूतीच्या एकवटलेल्या हाताने त्या फडक्याला धुतले की, ते देव्हारा पुसण्याच्या पात्रतेचे ठरावे इतके कसब लेखिकेने दाखविले. महादेवींच्या निःस्वार्थ प्रेमाचा वर्षाव मिळविण्यासाठी या उपेक्षित व्यक्तींनीही मग आपले आयुष्य वेचले. क्रूर जगाने त्यांच्या शरीरांवर व मनांवर ठसठसणाऱ्या जखमाच केल्या होत्या. महादेवींनी जेव्हा त्यांवर हळुवार फुंकर घातली, तेव्हा त्या व्यक्तींनी आपले होते नव्हते तेवढे सामर्थ्य पणाला लावले. लहानपणी लेखिकेला जिवापाड जपणारा रामा, वैधव्याची, एकटेपणाची व जाचाची वेदना विसरून

अनुक्रमणिका

लेखिकेच्या बाहुलीचा संसार थाटून देणारी मारवाडी भाभी, सावत्र आईचा जीवघेणा त्रास मुकाट्याने सहन करून जिवाभावाच्या गप्पा मारणारी त्यांची बालसखी बिंदा, आपल्या पुनर्विवाहाची हृदय हेलावून टाकणारी करुण कहाणी सांगून मन मोकळे करणारी बिट्टो, एकलव्याच्या पावलावर पाऊल टाकून गुरुऋण चुकविणारा मळकट आणि गरीब, उपेक्षित घीसा, लेखिकेचे उपकार सदैव स्मरणारा व त्यासाठी आपला जीव धोक्यात घालूनही वसतिगृहासाठी भाजी–पाला पोचविणारा आंधळा आलोपीदीन, गरिबीने पछाडलेले कुंभार पतिपत्नी बदलू–राधिया, एऱ्हवी नवीन आकाराची भांडी बनविण्याचे टाळणारा पण लेखिकेकडून मिळणाऱ्या सहानुभूतीची परतफेड करण्यासाठी पत्नीच्या मृत्यूचे डोंगराएवढे दुःख पचवून न चुकता सरस्वती, कृष्ण, बुद्ध इ. कलाकुसरपूर्ण मूर्ती लेखिकेला आणून देणारा बदलू, सांगायला शब्दही कमी पडतील इतक्या यातना व चारित्र्यहीनतेचा खोटा आरोप सहन करून हसत–खेळत जगणारी आणि लेखिकेच्या सहवासात आपले दुःख विसरणारी छलमा या व्यक्तींनी दाखविलेला स्नेह, ओतलेले मन व उपकाराची परतफेड करण्याच्या भाबड्या इच्छेने आपल्या प्राथमिक गरजाही अपूर्ण ठेवून लेखिकेला दिलेल्या छोट्या–छोट्या वस्तूंच्या भेटी, ही दृश्ये क्रूर, अन्यायी, अंध व स्वार्थी समाजावर आसुडांचे फटके ओढताओढता न कळत लेखिकेकडून मिळणाऱ्या न्यायाची, प्रेमाची, सहानुभूतीची थोरवी गातात. सभ्य, श्रीमंत परंतु माणुसकीहीन वर्गाला या असभ्य दारिद्र्याने पछाडलेल्या पण माणुसकीने ओथंबलेल्या व्यक्तींनी बरेचसे काही शिकविले आहे.

"स्मृति की रेखाएँ" मधली रेखाचित्रेसुद्धा अशीच हुरहूर लावून जातात. 'अतीत के चलचित्र' मधील पात्रांप्रमाणेच सामान्य व गौण अशा व्यक्ती या रेखाचित्रांचा विषय बनल्या आहेत. लेखिकेच्या सहवासात आलेल्या या माणसांच्या सामान्यत्वातच कुठेतरी असामान्यत्व दडलेले आहे. कोळशाच्या खाणीत सापडणाऱ्या हिऱ्याची जी दुर्दशा झालेली आढळते, अगदी तशीच परवड या व्यक्तींच्या आयुष्याची झालेली ! पण रत्नपारखाच्या हातात पडलेल्या हिऱ्याचे भाग्य जसे उजळते, तसेच या व्यक्तींच्या बाबतही घडले. भक्तिन, चिनी फेरीवाला, मुन्नूकी माई, ठकुरी बाबा, गुंगिया, बिबिया इ. व्यक्ती तशा पाहिल्या तर (भक्तिन सोडून) अल्पकाळच लेखिकेच्या सहवासात राहिल्या. पण अशा काही त्यांच्या जीवनप्रवाहात सामावून गेल्या, की त्यांनी घातलेली भर वगळून लेखिकेच्या जीवनाचे मोजमापच करता येऊ नये. अल्पावधीतही आपल्या जीवनातील बऱ्यावाईट घटना लेखिकेला सांगणारा व आपल्या हरवलेल्या बहिणीच्या प्रेमाची उणीव लेखिकेच्या प्रेमाने भरून काढणारा चिनी फेरीवाला, मनमोकळेपणाने आपल्या जीवनाची परवड सांगणारी मुन्नूची माई, यात्रेच्या काही दिवसांत लेखिकेला अतोनात प्रेम देणारे ठकुरीबाबा व त्यांचे श्रद्धाळू 'कुटुंब', दुःख गिळून लेखिकेकडून पत्र लिहून घेणारी मुकी गुंगिया रेखाचित्रांचे विषय बनून वाचकांकडून भरपूर प्रेम व सहानुभूती तर मिळवतातच; त्याचबरोबर लेखिकेच्या गुणांवरही प्रकाश टाकतात. आपल्याबद्दल विश्वास निर्माण करण्याची लेखिकेची हातोटी विलक्षण आहे. हीन व अशिक्षित लोकांत वावरताना लेखिका आपल्या श्रेष्ठत्वाची किंवा उच्च पदाची जाणीवही कधी या लोकांना करून देत नाही. लेखिका आपल्यापेक्षा कोणी मोठी आहे याची भिंत त्या भाबड्या लोकांमध्ये व लेखिकेमध्ये कधी निर्माण होऊ शकली नाही यातच लेखिकेच्या मनाचे सगळे मोठेपण दृग्गोचर होते. एका महाविद्यालयाच्या प्राचार्या, कार्यरत लेखिका इत्यादी महत्त्वपूर्ण जबाबदाऱ्या पार पाडत असतानाही त्या उपेक्षितांच्या उद्धारविकासासाठी अधिकांश वेळ स्वखुशीने देतात, जिव्हाळ्याने अशिक्षित लोकांची पत्रे लिहितात, खेड्यांत जाऊन दुर्लक्षित बालगोपालांना शिकवितात महिलांना उपयुक्त असे शिक्षण देऊन त्यांना स्वावलंबी बनविण्यासाठी धडपड करतात. आणि हे सगळे मोठ्या रसिक मनाने, उत्साहाने आणि आपली विनोदबुद्धी जागृत ठेवून करतात. हे कार्य मग इथेच संपत नाही. तर या अनुभवांना आपल्या साहित्यात रेखाटून त्यांना अमरत्वही बहाल केले जाते. ही सगळी प्रक्रियाच मोठी विलक्षण आहे. हे सगळे अनुभव आणि या अनुभवांतून जाताना

जे वाटले त्याचे चित्रमय अंकन वाचकांना मोठे लोभस वाटते. चिनी फेरीवाला पहिल्यांदा 'सिस्टर' अशी हाक मारतो तेव्हा त्यांना वाटते, मला हाक मारण्यासाठी मैया, माता, जीजी, दिदिया, बिटिया, गुरुजी यांपैकी एखादे संबोधन याला मिळाले नाही का? 'मेमसाब' अशी हाक मारताच त्यांना वाटते, की कोणीतरी आपला सगळा परिचय हिसकावून घेतला आहे आणि आपल्याला गाउनमध्ये लपेटले आहे. ठकुरीबाबांसारख्यांच्या जीवनाचे विश्लेषण करताना त्या म्हणतात, 'या खेडवळ, अशिक्षित लोकांमध्ये विकृती असलया तरी त्या वैयक्तिक असतात. आणि सद्भावना सामुहिक स्वरूप धारण करून व्यक्त होतात. याउलट, आपल्या समाजात दुबळया भावनांना आपण 'समाजाच्या' नावावर खपवतो व चांगल्या शक्तींना मात्र वैयक्तिक मोठेपण मानतो.' ही भेदक दृष्टी त्यांच्या विचारांत स्पष्ट जाणवते. रामाबद्दल बोलताना त्यांना आपल्या लहानपणीची कृत्ये आठवतात. ही सगळी भावंडे मिळून आईला पूजा करू देत नसत. त्या प्रसंगाचे सुंदर वर्णन त्यांनी केले आहे. ऋषिमुनींच्या यज्ञामध्ये अडथळा आणणाऱ्या राक्षसांची भूमिका जेव्हा ही बाल–गोपाल मंडळी घेत तेव्हा बिचाऱ्या रामावर 'विद्रोही लोकांना' वश करून घेण्याचे कार्य सोपविले जाई. त्यांच्या या विनोदबुद्धीची चुणूक बऱ्याच ठिकाणी वाचकांना आढळते. याबरोबर कुप्रथा, अंधश्रद्धा यांवरील आक्रोशही त्यांनी सशक्त शब्दांत व्यक्त केलेला पाहायला मिळतो. वृद्धावस्थेतही तिसरे लग्न करणाऱ्या बिट्टोच्या पतीबद्दल बोलताना त्या म्हणतात, 'स्त्री-उद्धारासाठी सदैव तयार असणाऱ्या वृद्ध परोपकारी लोकांची या पुण्यभूमीमध्ये, त्यातूनही आजच्या प्रगतियुगात कमतरता, नाही. बिचाऱ्या पुरुषाची तपश्चर्या स्त्रीमुळे भंग होत गेली! आणि म्हणूनच त्याने मायाविनी (?) स्त्रीजातीच्या दोषांचे निरूपण करण्यासाठी ग्रंथावर ग्रंथ रचले.' यातील सूक्ष्म विद्रोह मोठा मार्मिक आहे.

'मेरा परिवार' हा त्यांच्या रेखाचित्रांचा संग्रह तर हिंदी साहित्यातच काय पण अन्य भाषांच्या साहित्यातही मानाचे स्थान प्राप्त करू शकणारा आहे. ही रेखाचित्रे सर्व वयोगटांतील लोकांना आनंद देऊ शकतात हे त्यांचे महत्त्वपूर्ण वैशिष्टच आहे. लेखिकेभोवतीचे हे प्राणिजगत वाचकांनाही अतोनात ओढ लावणारे असे आहे. त्यांच्या हालचालींचे व स्वभाववैशिष्टयांचे सूक्ष्म व लोभस अंकन लेखिकेने केले आहे. यातील नीलकंठ (मोर), गिल्लू (गिलहरी), सोना (हिरनी), नीलू (कुत्ता), निक्की (नेवला), रानी (घोडी) ही रेखाचित्रे वाचकांच्या मनावर खोलवर आपल्या स्मृती कोरून जातात. त्या प्राण्यांचे निष्पाप प्रेम, सहज हालचाली मन भारावून टाकतात. ज्या तन्मयतेने महादेवींनी या प्राण्यांची सेवा केली आणि ज्या करुण परिस्थितीत या प्राण्यांचा अंत होत गेला ही सगळीच कहाणी कधीही न पुसली जाणारी करुण शोकांतिका आहे. भौतिक स्वार्थाच्या पलीकडे जाऊन व व्यावहारिक दृष्टीच्या सीमा ओलांडून प्राणिजगतावर प्रेम करताकरता या जगताचा जो परिचय करून दिला आहे तो खरोखरीच आगळा–वेगळा आहे. मोराचे वर्णन करताना त्या लिहितात. "मंजरियोंके बीच उसकी नीलाभ झलक संध्या की छायासे सुनहले सरोवर में नीले कमलदलोंका भ्रम उत्पन्न कर देती थी।" सोना हरिणीच्या डोळयांचे वर्णन करताना त्या लिहितात, "उसकी आँखें तो मानो करुणा की चित्रलिपि है।" शब्दांमधून चित्र उभे करण्याची त्यांची शैली व काव्यात्मकतेच्या साहाय्याने बारकावे व्यक्त करण्याची पद्धती वैशिष्टयपूर्ण वाटते. नीलू (कुत्रा) च्या आईचा करुण अंत अंकित करताना दिलेली उपमा त्या दृश्याला किती जिवंत बनविते बघा– "बर्फपर रक्त के पनीले धब्बे ऐसे लगते थे, मानो किसी बालककी ड्राइंग पुस्तिका के सफेद पृष्ठपर लाल स्याही की दावात उलट गई हो।" कधी कधी रोचक पद्धतीने त्यांनी या प्राण्यांच्या सहवासातले अनुभव व्यक्त केले आहेत. घरातल्या मोठ्या माणसांची नजर चुकवून 'नीलू'-बरोबर दुपारच्या वेळी भटकायला जाणाऱ्या बालगोपालांचा नेता लेखिका असायची. असेच एकदा झाडाखाली बसलेले असताना नीलू गवतामधून काही तरी शोधून तोंडात पकडून आणतो. लेखिकेला वाटते, मुंगुसांच्या कुटुंबातील हे 'घ्यान'ही आपल्यासारखेच अराजकवादी दिसते. बरे झाले आपल्याला अजून एक आपल्यासारखाच 'जीव' मिळाला.


अनुक्रमणिका

त्याला पाळण्यासाठी म्हणून घरी घेऊन जातात. पण आई 'भूतदयेचा' उपदेश देऊन त्याला परत त्याच्या बिळात नेऊन सोडायला सांगते. लेखिकेला वाईट वाटते. त्याची दया येते. इतक्या मोठ्या घरात वावरतानाही जिथे लेखिकेला आई-वडिलांच्या शिस्तीचे पालन करणे अवघड जाते, तिथे बिचाऱ्या या प्राण्याची काय स्थिती होत असेल ? एवढेसे बिळ, चोवीस तास आईवडिलांची देखरेख म्हणजे बिचाऱ्याला जरासुद्धा उनाडपणा करता येत नसणार ! आणि म्हणूनच 'त्याचे घर सापडले नाही' असे सांगून त्याला आपल्या जवळ ठेवून घेते. असे कितीतरी मजेदार व हसवणारे प्रसंग यातील रेखाचित्रांमध्ये वाचायला मिळतात.

या तीनही रेखाचित्रसंग्रहांत आलेली पात्रे नकळत लेखिकेच्या चिंतनाला वेगळे वळण, वेगळे परिमाण प्राप्त करून देतात. ही पात्रे लेखिकेचे लक्ष वेधून घेतात. कारण लेखिकेच्या मनात कुठेतरी संवेदनेचा अखंड प्रवाह वाहत आहे. 'अतीत के चलचित्र' व 'स्मृति की रेखाएँ' मधील रेखाचित्रांच्या माध्यमातून लेखिकेने विधवासमस्या पुनर्विवाहाचा आसुरी प्रश्न, आंतर्जातीय विवाह-समस्या, गरिबीच्या भस्मासुराने गिळंकृत केलेल्या माणसांचे प्रश्न, हीन जातीचा शाप घेऊन आलेली बेकसूर माणसे, त्यांची दुःखे, अपंगांच्या समस्या, अंधश्रद्धा व परंपरेचे बळी ठरलेली हेकट माणसे आणि त्यांच्यापासून दुखावल्या जाणाऱ्या व्यक्ती इत्यादींवर ( उपदेशकाच्या भूमिकेपासून अलिप्त राहून ) विचार केला आहे व वाचकांना विचार करायला लावला आहे. यात लेखिकेची भूमिका कोरडी सहानुभूती दाखविण्याची किंवा समाज-सुधारणेचा पोकळ बडेजाव दर्शविणाऱ्याची नाही, हे स्पष्ट जाणवते. सक्रिय राहून त्या प्रश्नांकडे पाहणारी लेखिका खरोखरीच त्या व्यक्तींचे योग्य असे श्रद्धास्थान वाटते. "हमारे हजारो सुख हमें मनुष्यताकी पहली सीढितक पहुँचाने में भी असमर्थ हो, लेकिन हमारा एक बूंद आँसू भी हमें अधिक उर्वर बनाये बिना नहीं गिरता" मधील भूमिका 'दुःखांमुळे मने जुळतात' या अनुभवाला पुष्टी देणारी तर आहेच; त्याचबरोबर उपेक्षित वर्गाशी समरस होणाऱ्या लेखिकेच्या भूमिकेच्या मर्मावरही प्रकाश टाकते.

या रेखाचित्रांची प्रवाही व उत्कट भाषा, सूक्ष्म निरीक्षणशक्ती, चित्रीकरणातील बारकावे रंगवण्याची शैली यांमुळे पात्रांच्या अंतर्बाह्य गुण-दोषांचे हुबेहूब दर्शन तर वाचकाला होतेच; त्याचबरोबर लेखिकेच्या उत्तम अभिव्यक्तिक्षमतेशी वाचकांची ओळखही होते.

'पथ के साथी' या संस्मरणसंग्रहात त्यांनी आपल्या साहित्यिक मित्रांबद्दल आदर, स्नेह, आपुलकी व श्रद्धा व्यक्त केली आहे. मैथिलीशरण गुप्त, सुभद्राकुमारी चौहान, 'निराला', प्रसाद, पंत, सियारामशरण गुप्त यांच्या सहवासातील सुंदर आठवणी व्यक्त करताना या सर्व प्रसंगांतील भावनात्मकतेला महादेवींनी हृदयस्पर्शी शब्दांत पकडलेले आहे. ग्रथित केलेल्या या आठवणी वाचकांना भावणाऱ्या अशा आहेत.

'शृंखला की कडियाँ', 'क्षणदा' व 'साहित्यकारकी आस्था तथा अन्य निबंध' हे अनुक्रमे स्त्रीविषयक निबंध, ललित निबंध व आलोचनात्मक निबंध यांचे संग्रह आहेत. संतुलित दृष्टिकोण, चौफेर निरीक्षण, स्पष्टवादिता, प्रामाणिकता व दुराग्रहरहित विचारप्रणाली इ. श्रेष्ठ गुणांमुळे हे निबंधही श्रेष्ठ पातळीवर उतरतात. 'निबंधकार हा समाजाची आलोचना करणारा आलोचक असतो' या उक्तीची प्रामाणिकता महादेवींचे निबंध वाचताना प्रत्ययाला येते. निबंधांत भाषा आणि भाव यांच्यातील गरिमामय सांगड, संकल्पनांमधील सूक्ष्म अंतर अचूकपणे स्पष्ट करण्याची शैली, तीव्र समस्यांवर प्रकाश टाकण्याची यशस्वी पद्धत इत्यादींमुळे त्यांचे निबंध वाचकांच्या चिंतनाला विशिष्ट दिशा देतात. हिंदी साहित्यातील श्रेष्ठ आलोचक डॉ. नगेंद्र यांनी महादेवींच्या निबंधांबद्दल जे मत व्यक्त केले आहे, ते फार मोलाचे आहे. डॉ. नगेंद्र म्हणतात, "आज कोणाही जिज्ञासू व साहित्यप्रेमी व्यक्तीला साहित्यिक क्षेत्रातील मूल्यामूल्यांतील वादळी संघर्षातून जावे लागत आहे. अशा स्थितीत दिशाहीन बनलेल्याला महादेवींचे निबंध हे प्रकाशदीपाप्रमाणे वाटतील. या प्रकाशदीपाच्या साहाय्याने तो नक्कीच



अनुक्रमणिका

स्थैर्य प्राप्त करू शकेल. महादेवींचे निबंध काव्याच्या शाश्वत सिद्धांताचे व्याख्यान आहेत."

गद्यसाहित्यातील त्यांचे श्रेष्ठत्व भावले तरी त्यांचे नाव साहित्यक्षेत्रात स्मरणीय ठरते ते त्यांच्या काव्यामुळे. गद्यलेखनात त्या जितक्या बहिर्मुख होऊन आपल्या अवतीभोवतीच्या वातावरणाचा चौफेर विचार करतात व समष्टीपर्यंत पोचतात, काव्यात त्या तितक्याच अंतर्मुख होतात व स्वतःच्या सुख-दुःखांना शब्दरूप देतात. येथेही त्या अगदी उत्तम प्रकारे समष्टीपर्यंत पोचतात; पण अंतर्मुख होऊनच. गद्यलेखनात इतरांची सुख-दुःखे जाणून घेऊन त्यांना शब्दरूप देता-देता स्वतःच्या सुख-दुःखांकडे पाहायला त्यांना वेळच मिळत नाही. काव्यात मात्र त्या स्वतःच्याच राहतात ( बाह्य जग हे तेव्हा पार्श्वभूमीमध्ये सुरक्षित असतेच ). मग प्रयासाने आवरलेले अश्रू, दुर्लक्षित राहिलेली स्वतःची दुःखे, अनावर झालेल्या भावना, भावनेत आकंठ बुडालेल्या मनाच्या तक्रारी इ. इ. कवितेच्या ओळीओळींतूनच काय, पण दोन ओळींमधील रिक्त जागेतूनही डोकावू लागतात.

भौतिक जीवनातील वेदनेला आध्यात्मिक पातळीवर नेऊन अमरत्व कसे बहाल केले जाऊ शकते, प्रणयजीवनातील अभाव व दुःखे अमर अशा ईश्वराशी नाते जोडून कशी सुखद व सुसह्य बनविली जातात, क्षुद्र मानवी जीवन दिव्य प्रियकराच्या चरणी अर्पण करून कसे सुगंधित केले जाते याची कष्टप्रद परंतु लोभस, खडतर परंतु सुखद यात्रा 'यामा' व अन्य काव्यसंग्रहांत वाचकांना पाहायला व अनुभवायला मिळते. हो, अनुभवायला सुद्धा ! कारण भाव इतके उत्स्फूर्त व अभिव्यक्ती इतकी अप्रतिम आहे की, कवयित्री व वाचक यांच्यांतले दुरावे भराभर गळायला लागतात. कवयित्रीच्या भावना व अभाव, दुःखे यांचे उदात्तीकरण कुठेही अवास्तव, अवाजवी वाटत नाही. वाचकाला ही सगळी साधना विश्वासार्ह वाटते; कारण यात कुठेही भौतिक जीवनाचा त्याग केलेला नाही. उलट एके ठिकाणी त्या लिहितात—

' ज्या तुझ्या स्वर्गात फुलांना कोमेजताही येत नाही, ताऱ्यांना विझताही येत नाही अशा स्वर्गात मी कशासाठी येऊ ? नष्ट होताहोताही जीवन जगण्यातला आनंद लुटण्याचा हा माझा अधिकारच मला लखलाभ होऊ दे. ' याचा अर्थ जिथे सगळे शाश्वत आहे, परिवर्तन नाही असा नीरस स्वर्ग त्यांना नको आहे. हे जीवन त्यांना हवेहवेसे वाटणारे आहे. दुःखांच्याबद्दलही तक्रार किंवा तिरस्काराची भावना त्यांच्या मनात कधीच शिरू शकली नाही. आणि दुसरे महत्त्वाचे कारण असे, की त्यांच्यातला कवी आणि मानव दोघे सख्यभावाने जगतात, जीवन अनुभवतात आणि प्रतिक्रियास्वरूप संतुलित असे निर्णय घेऊन त्या निर्णयाना कार्यान्वित करतात. त्यांची ही दोन्ही व्यक्तिमत्त्वे कधीही एकदुसऱ्याचा पराभव करण्यासाठी स्पर्धा करीत नाहीत किंवा एकदुसऱ्याची हत्यासुद्धा करीत नाहीत. उदात्तीकरणाची ही यात्रा केवळ विचारांपुरतीच मर्यादित राहते असे नाही. त्या विचारांना प्रत्यक्षात उतरविले जाते. म्हणूनच या भावनांमध्ये कुठेही अंतर्विरोध व विकृती आढळत नाहीत. जीवनाचे सातत्य, नावीन्याची अखंडता ही कोणाही सुदृढ मनाला हवीशी वाटते. महादेवींच्या काव्यात याचे दर्शनही वाचकांना होते. ' मी प्रियकराला याच जीवनात भेटले, ओळखले तर मग यात्राच संपेल. मग नावीन्यही उरणार नाही. ' हा भाव जितका सशक्त आहे, तितकाच लेखिकेच्या व्यक्तिमत्त्वाची ओळख करून देण्याच्या दृष्टीने समर्थही आहे. 'यामा'तील कवितांमध्ये प्रणयाचे सारे भाव अलौकिक अशा प्रियकराभोवती गुंफले गेले आहेत. आणि कवयित्रीचा आग्रह आहे, की या अलौकिक भावनांना समजून घेण्यासाठी लौकिक भावनांचा आधार घेतला गेला पाहिजे. ' यामा ' व इतर संग्रहांतील कवितांमध्ये धूप, दीप, पूजा, पुजारी, मंदिर, वीणा, गोधूली इ. प्रतिके वेगवेगळ्या संदर्भात पुन्हा पुन्हा आली आहेत. शब्द आणि रेखा या दोन्ही माध्यमांतून आपले अमूर्त भाव मूर्त करण्याची पराकाष्ठा महादेवींनी केली आहे. ' यामा'तील त्यांच्या कवितांना लाभलेली चित्रांची साथ कवितेच्या भावार्थाला पूरक अशी ठरणारी आहे.

प्रियकराच्या चिरविरहात चिरमिलनाची चिरप्रतीक्षा उराशी बाळगून कवयित्री जीवन कंठताना दिसते. झंझावात, प्रलय, रात्र, प्रभात, मेघ, हिम-

बिंदू इ. निसर्गदृश्यांत कवयित्रीला आपल्या भावनांचे पडसाद आढळतात. कधी 'प्रिय'ची चाहूल लागल्याने पृथ्वी पुलकित झाल्यासारखे वाटते. कधी त्याच्या उच्छ्वासरूपी 'समीर'चा स्पर्श व्हावा म्हणून तिचे मन आतुर होते. कधीकधी 'मूकमिलनाचा साक्षात्कार' होतो. तर कधी ही प्रेयसी पीडेचे सगळे साम्राज्य हुडकते– प्रियकराला शोधण्यासाठी. पण शेवटी निराशाच पदरात पडते. मिलन हे सत्य की भ्रम ? या प्रश्नावर लागले 'चिन्ह' शेवटपर्यंत चिकटून बसते. त्याला शोधण्याचे सगळे मार्ग खुंटतात. डोळे उगीचच भरभरून वाहतात. प्रियकराची वीणा मौन का ? हे कळत नाही. स्वप्नात एक क्षण तरी तो भेटावा म्हणजे अनंतकाळची तृष्णा तृप्त केली असती व त्या बळावर मधुर राग आलापून विश्वासाठी लोरी गायली असती, असे तिला वाटू लागते. पण शोकांतिका अशी की–

'अब विरह की रातको तू
चिर मिलन का प्रात कह रे'

अशी तिला आपल्या मनाची समजूत घालावी लागते आणि साऱ्या अभावांना 'गोड मानून' घेण्यासाठी मनाला तयार करावे लागते. एका दृष्टीने ही प्रियकराची निष्ठुरताच म्हणावी लागेल. पण प्रेयसीच्या हृदयात मायेचा अखंड पाझर आहे–

'मधुर मधुर मेरे दीपक जल
युग युग प्रतिदिन
प्रतिक्षण प्रतिपल
प्रियतम का पथ आलोकित कर'

–जो 'प्रिय' स्वप्नातही भेटू इच्छित नाही, त्यासाठी युगे–युगे तेवत राहून त्याचा मार्ग प्रकाशित करण्याची ही इच्छा कवयित्रीच्या मनातील सहनशक्ती, उदारता आणि प्रेमळपणाच्या गंगोत्रीवर प्रकाश टाकते.

'माझा अभिनव शृंगार आज प्रियकराला प्रसन्न का करू शकला नाही ?' यामधील स्त्रीसुलभ मनाची अभिव्यक्ती कवयित्रीच्या भाबड्या मनःस्थितीचे दर्शन घडवून आणते. कधी तिला वाटते, आपले पाणावलेले डोळे प्रियकरासाठी निरांजन बनतील. प्रियकराच्या प्रेरणेने जिंकलेले सारे काही त्यालाच अर्पण करावे. कधी या प्रेयसीला वाटते जर 'प्रिय' आपल्या रोमारोमांमध्ये सामावला आहे तर मग आपला वेगळा असा परिचय काय असू शकेल ? मात्र कधी कधी तिला वाटते–

'मैं नीरभरी दुखकी बदली
परिचय इतना इतिहास यही
उमड़ी कल थी मिट आज चली'

– दुःखाचा छोटासा मेघ ! एकदा पावसाच्या धारा बरसल्या की मेघाचे अस्तित्व ते काय ? आता आहे तर मग नाही ! तसेच काहीसे स्त्री जीवन ! पण यात नैराश्य किंवा पराजयाचा, दुर्बलतेचा भाव नाही. सृष्टीच्या अटळ नियमाला आनंदाने स्वीकारल्याची पावती आहे ही !

कवयित्रीकडे चंचल स्वप्नेही आहेत. ती तिने नयनांतून ओघळणाऱ्या पाण्यावर जोपासली आहेत आणि पापण्यांच्या आधाराने त्यांचा सांभाळ केला आहे. असे असले तरी विरहाचे रंगी-बेरंगी क्षण आणि अश्रूंचे उरलेले काही कण घेऊन 'निश्वास-दूत' 'शिथिल पावलांची चाहूल' घेण्यासाठी बाहेर पडतो. विरहाची ही रात्र किती उरली आहे ? हे विचारण्यात काही अर्थ उरलेला नसतो. विरह पचविण्याची इतकी सवय झालेली असते की, विरहाची 'कल्प' समान अवधी क्षणाएवढीच वाटू लागते. विरहाचे युग मिलनाच्या लघु-क्षणाएवढे भासते. तरीसुद्धा कवयित्रीला हे उमजत नाही की, सुख-दुःखामध्ये कोण अधिक तीव्र आहे ? तिला एवढेच माहीत आहे की, विश्व-क्रंदनाशी ओळख करून घ्यायची आहे व दुःखालाच सुख मानायचे आहे. आणि विरहाच्या या आराधनेत आराध्यमय होऊन जाण्यात जीवनाची सार्थकता शोधायची आहे. या सगळ्या क्रिया–कलापात 'मधु–स्मृती' जतन करून ठेवायच्या आहेत. ही सगळी यात्राच विलक्षण रोमांचक व भारावून टाकणारी आहे. इतक्या सगळ्या 'आघातां'च्या इतिहासाला वाहून नेत असतांना कवयित्रीची ही व्यापक व पवित्र भावना पहा किती भारावून टाकणारी आहे–

'यह मंदिर का दीप इसे नीरव जलने दो
पल के मन के फेर पुजारी विश्व सो गया,
प्रतिध्वनि का इतिहास प्रस्तरों बीच खो गया,
झंझा के दिग्भ्रान्त रात की मूर्च्छा गहरी,

आज पुजारी बने, ज्योतिका लघु प्रहरी
दूत सांझ का इसे प्रभाती तक चलने दो '

– नीरव असा तेवत राहणारा मंदिरातील छोटासा दीप, झोपी गेलेले विश्व, शिलाखंडात हरवलेला प्रतिध्वनींचा इतिहास, झंझावातात दिग्भ्रांत झालेली रात्र आणि त्यामुळे आलेली मरगळ या सगळ्या अस्वस्थ करून टाकणाऱ्या परिस्थितीत मंदिराचा पुजारी हा या लघु ज्योतीचा 'प्रहरी' बनावा आणि दिवेलागणीचा हा 'दूत' प्रभातीपर्यंत तेवत रहावा ही दुर्दम्य इच्छा किती चित्रमय आहे हे वाचताक्षणीच लक्षात येते.

' धूप-सा तन दीप-सी मैं
अश्रु से गीला सृजन-पल '

– यामधील पावित्र्यही प्रणयिनीच्या मानसिक भव्यतेचे दर्शन घडवून आणते. धूपामधील सुगंध, पवित्र वातावरणनिर्मितीची क्षमता, मन प्रसन्न करण्याची शक्ती व साधकाचा आराध्याप्रत पोचण्याचा मार्ग सुलभ करण्यासाठी त्यागाची चरम सीमा इ. भाव व दीपामागील प्रकाश देण्याची, स्वतः नष्ट होऊन इतरांना पथप्रदर्शन करण्याची इच्छा इ. भावांची गुंफण भावणारी आहे. हे सगळे अध्याहृत राहते आणि कवयित्रीच्या एकेका शब्दामागील तिची भूमिका समजावून घेण्यासाठी वाचकाला सतर्क राहावे लागते. काव्याचा रसास्वाद घेतानाची वाचकाची ही यात्राही रमणीय होते. कारण ही प्रतिके क्लिष्ट नाहीत. बुद्धीपेक्षा भावनेला दुजोरा देणारी आहेत.

विरहाची ही महायात्रा करणाऱ्या कवयित्रीला न राहवून व्याकुळतेने म्हणावे लागले–

" नहीं अब गाया जाता देव
थकी उंगली हैं ढीले तार
विश्ववीणा में अपनी आज
मिला लो यह अस्फुट झंकार "

– प्रियकराला प्रसन्न करण्यासाठी राग आलापता आलापता थकलेली कवयित्री विश्ववीणेत आपला अस्फुट आवाज सामावून घ्यायला सांगते. हे पलायन नाही. अनंत प्रयत्नानंतर मागितलेला प्रयत्नांचा हात आहे. ही अखेरची विनवणी प्रियकराने ऐकली की नाही ? ऐकली असल्यास मदतीला तो धावून आला किंवा नाही ? कळायला काही मार्ग नाही. पण असंख्य सहृदय साहित्यप्रेमी रसिकांनी मात्र वेळोवेळी या कवितांना व कवितेतील भावनांना आपली खरीखुरी 'हमदर्दी' दाखविली आहे.

विरह ही घटना एकच. मनाच्या दाखविलेल्या कितीतरी प्रतिक्रिया, कितीतरी भावावस्था ! महादेवींचे काव्य हे अशाच अनेक भावावस्थांचे काव्य आहे. आणि म्हणूनच ते मानवी स्वभावाचे व मनाचे यथोचित दर्शन घडविण्यास समर्थ ठरले आहे. या कवितांत शब्द इतके पारदर्शी बनले आहेत की, स्त्रीमनाचे हुबेहूब दर्शन घडते. मानवी जीवनाला हा विरह काही नवीन नाही. युगानुयुगे चालत आलेली स्त्रीजीवनाची ही अतिप्राचीन अशी कहाणी आहे. पण या विरहाकडे पाहण्याचा, त्याला पचविण्याचा, त्या प्रसंगांना सामोरे जाण्याचा व त्याचे स्वागत करण्याचा जो मार्ग कवयित्रीने दाखविला आहे, स्वीकारला आहे तो सर्वथा नवीन आहे. हा विश्वास रोमांचक, भारावून टाकणारा तर आहेच, पण यात कुठेही नाटकीपणा जाणवत नाही.

महादेवींच्या कवितांचा विचार करताना त्यांत एकच एक सूर असल्याचे जाणवते. तोच तो विषय, एकच भाव व तीच ती प्रतिके. यामुळे नीरसता आणि पुनरावृत्तीमुळे येणारी शिथिलता जाणवते. पण ही उणीव त्यांच्या अभिव्यक्तिक्षमतेने व काव्यात्मक, कलात्मक गुणांमुळे दूर झाली आहे. भावना एकच असली तरी संदर्भ इतके विविध आहेत व इतक्या विविध पहलूंनी त्या भावनेकडे पाहिले आहे, की सूक्ष्मपणे अवलोकन करणाऱ्याला नीरसता जाणवत नाही. एकच भावना पण अंतर्बाह्य परिस्थितींमुळे भावावस्था इतक्या वेगवेगळ्या आहेत, की विविधतेने नटलेला तो एक पुष्पगुच्छ वाटतो. कधी कधी कवयित्री वर्णन इतके करतात, की गीत 'सपाट' बनते. पण हे क्वचितच. काव्यविलास व काव्यात्मक उंची गाठण्याची क्षमता मात्र बऱ्याच वेळा जाणवते. ही काही उदाहरणे यापैकीच होत–

' धूप बन उड़ते जाते हैं प्रतिपल मेरे स्पंदन रे '
' स्मृति निराश पुजारिनी–सी मेरी राह देखती '
' बंदिनी बनकर हुई बंधनों की स्वामिनी '
' एक ज्वाला के बिना मैं राखका घर हूँ '

'जिसने उसको ज्वाला सौंपी उसने इसमें मकरंद भरा'

'दोनों संगी पथ एक किन्तु कब दीप खिला कब फूल जला'

यामधील धूप बनून उडून जाणारे स्पंदन, वाट बघणारी निराश पुजारीणीसमान स्मृती, बंदिनी बनून बंधनांची स्वामिनी बनण्याचा भाव, ज्वाला नसेल तर राखेचा ढीग बनण्याचीच नियती या कलेच्या कल्पना कितीतरी वरची पातळी गाठतात. ज्वालेचे दान देणाऱ्याला प्रतिदानस्वरूपात मधु दिला जावा हा भाव आणि त्याची अभिव्यक्ती किती विलक्षण सुंदर आहे. तसेच पथ एकच, त्यावर चालणारे दोघे एकमेकांचे साथीच. तरीसुद्धा दीप उमलण्याची आणि फूल प्रज्वलित होण्याची वेळ मात्र एक नव्हती. यातली शोकांतिका जितकी तीव्रतेने जाणवणारी आहे व हळहळीच्या स्वरूपातील आपल्याबद्दलची प्रतिक्रिया वाचकाकडून वसूल करण्यासाठी समर्थ आहे, तसेच विशेषण-विपर्ययामुळे साधण्यात आलेले औचित्य, व्यक्त झालेली तीव्रता व चमत्कृतीमुळे लक्ष वेधून घेण्याची कुशलता वाखाणण्यासारखी आहे. तसेच त्यांच्या कवितेत नेहमी दिसणारी 'सत्य, शिव व सुंदर'ची त्रिवेणी त्यांच्या अभिव्यक्तीच्या सीमांचा विस्तार करते. कवयित्रीच्या हृदयसागराच्या विराट घडामोडींचे उंच, सखोल, व्यापक, समर्थ दर्शन जेव्हा काव्यप्रेमी रसिकाला त्यांच्या शब्दा-शब्दांतून होते, तेव्हा तोही अगम्य जीवनाबद्दल नकळत तत्त्ववेत्याच्या भूमिकेतून विचार करायला लागतो. हेही त्यांच्या कवितेचे वैशिष्ट्य मानावे लागेल.

महादेवींचा 'यामा' काव्यसंग्रह खरोखरीच अनुभूतींचा व अनुभूतिग्रहणक्षमतेचा विकासप्रवास आहे. 'सांध्यगीत'च्या 'अपनी बात' मध्ये त्यांचे हे उद्गार याची पुष्टी करतात. त्यांनी म्हटले आहे, "'नीहार' के रचनाकाल में मेरी अनुभूतियों में वैसी ही कुतूहलमिश्रित वेदना उमड़ आती थी जैसी बालक के मनमें दूर दिखाई देनेवाली अप्राप्य सुन-हली उषा और स्पर्श से दूर सजल मेघ के प्रथम दर्शन से उत्पन्न हो जाती है, 'रश्मि' को उस समय आकार मिला जब मुझे अनुभूति से अधिक उसका चिंतन प्रिय था, परंतु 'नीरजा' और 'सान्ध्यगीत' मेरी उस मानसिक स्थिति को व्यक्त कर सकेंगे जिसमें अनायास मेरा हृदय सुख-दुःख में सामंजस्य का अनुभव करने लगा।" कुतूहल, विचार व चिंतन, मनन आणि सुख-दुःखांत सामंजस्य स्थापण्याची प्रवृत्ती हे कुठल्याही श्रेष्ठ कवीच्या प्रतिभेच्या विकासाचे तीन महत्त्वाचे सोपान आहेत. हे सोपान चढता चढताच कविता 'पूर्णत्वा'-कडे यशस्वी वाटचाल करीत असते. स्वतःच्या दुःखांना सामोरे जाता-जाता विश्ववेदनेशी नाते जोडणारी महादेवींची ही कविता या अर्थानेही श्रेष्ठ आहे, की यात कुठेही अवडंबर नाही. स्वतःच्या दुःखांचा पसारा मांडून इतरांच्या सहानुभूतीला पात्र होण्याच्या प्रवृत्तीचा लवलेशही नाही.

'वेदनेच्या गायिके' ची करुण प्रार्थना तिच्या अज्ञात, अमूर्त प्रियकराच्या कानी पडली असल्यास त्याची त्याबद्दल काय प्रतिक्रिया झाली ? हे कळण्यास मार्ग नाही. पण असंख्य रसिक, मर्मज्ञ, वाङ्मयप्रेमींनी वेळोवेळी ही साद ऐकून मुक्त कंठाने व आपलेपणाने त्यांच्या कृतींचे कौतुक केले आहे. 'दाद' दिली आहे. त्यांना मिळालेली 'पद्मभूषण' पदवी, 'भारत-भारती पुरस्कार' त्यांच्या 'नीरजा' काव्यसंग्रहाला मिळालेला 'सेक्सारिया पुरस्कार', 'यामा'ला मिळालेले 'मंगलाप्रसाद पारितोषिक' व १९८२ सालचे दीड लाख रुपयांचे सर्वश्रेष्ठ 'भारतीय ज्ञानपीठ पारितोषिक' हा या कौतुकाचाच एक महत्त्वपूर्ण भाग आहे.



अनुक्रमणिका

**कृष्णराव भालेकर समग्र वाङ्मय :** संपादक– सीताराम रायकर, महात्मा फुले समता प्रतिष्ठान प्रकाशन, ७३ नाना पेठ; पुणे–२; एकमेव विक्रेते श्रीविद्या प्रकाशन, पुणे; किं. पन्नास रुपये; पृष्ठे २५४.

'कीर-मालशे' यांनी सन १९६९ साली 'म. फुले : समग्र वाङ्मय' प्रकाशित केल्यानंतर, आता कृष्णराव भालेकर यांच्या समग्र वाङ्मयाची मराठी वाचकांना उपलब्धी होत आहे. माझे मित्र डॉ. आर. एम. पाटील (पुणे) – कै. भालेकर यांचे नातू– यांची बऱ्याच वर्षांची इच्छा डॉ. बाबा आढाव व संपादक श्री. सीताराम रायकर (पुणे) यांच्या चिकाटीने पुरी झाली आहे. साहित्य संस्कृती मंडळानेही अनुदान दिले. श्री. लाटकर (कल्पना मुद्रणालय, पुणे) यांची सुंदर छपाई, चांगला कागद या पुस्तकास लाभला आहे. मुखपृष्ठ सुभाष अवचटांनी तयार केले आहे.

डॉ. आढाव यांनी फुले प्रतिष्ठानच्या संशोधन-विभागाचा उद्देश प्रथमपृष्ठावर दिला आहे व कृष्णराव पांडुरंग भालेकर (१८५०–१९१०) यांचे पुस्तकाच्या मुखपृष्ठाच्या पाठीमागे थोडक्यात चांगले दर्शन घडविले आहे. दोनशे चोपन्न पाने आत असलेल्या ह्या ग्रंथात भालेकरांचा आर्ट पेपरवर चांगला स्वच्छ फोटो छापला आहे. तालमीच्या योगे म. फुले यांच्या प्रमाणे उत्कृष्ट शरीर कमावलेल्या ह्या सत्यशोधकाचे दर्शन वाचकांना प्राप्त होते. उपेक्षित वाङ्मय ब्यांयशी वर्षांनंतर पुढे आले आहे.

प्रस्तावना ह्या ३५ पानांच्या पहिल्याच विभागात मराठी वाङ्मयसेवक भालेकर यांचे विवेचक व विस्तृत चरित्र श्री. रायकर ( संपादक ) यांनी दिले आहे. हजारो, लाखो खेड्यापाड्यांतील शेतीत राबणाऱ्या उत्पादक व उपयुक्त बहुसंख्य वर्गाची अक्षरशत्रू अज्ञानी अवस्था, त्यांच्या उणिवा व तक्रारी, गाऱ्हाणी, त्यांची पिळवणूक व फसवणूक यांचे यथातथ्य जिवंत चित्र फुले यांचे सहकारी व नातलग कृ. पां. भालेकर यांच्या समग्र पद्य व गद्य प्राकृत मराठीत उमटले आहे. म. फुले यांच्या वाङ्मयाची पाठराखण यात सापडते. 'फुले वाङ्मय' पहिले म्हणून पल्लेदार वाक्ये, मोठमोठे परिच्छेद, अवघड संवाद, टीका व खंडन यांमुळे ते समजून घेण्यास कष्ट लागतात. भालेकरांची भाषा मराठी-प्राकृत ओघवती, बालबोध, प्रौढ टापटिपीची आहे. खंडनापेक्षा मंडन करणारी भारदस्त, जास्ती प्रसन्न, अर्थवाहक पण नेमका मर्मभेद करणारी तर्कशुद्ध वाटते. भालेकर हे फुल्यांच्याप्रमाणे शेतकरी-फुलमाळी समाजात जन्मले.

राणोजी भालेकर यांच्यापासून तीन पिढ्यांची पुढील वंशावळ तिसऱ्या पानावर छापली आहे. यावरून जो. गों. फुले यांची पत्नी सावित्राबाई ह्या राणोजीचे पाचवे व सर्वांत लहान मुलगे गोपाळ यांची मुलगी. गोपाळ भालेकर यांची पहिली बायको रुक्मीबाई वारल्यावर दुसरी बायको केली, तिची सावित्रीबाई ही मुलगी. अशी वेगळी माहिती मिळते. डॉ. माळी ( गारगोटी ) यांनी प्रसिद्ध केलेल्या सावित्रीबाई यांच्या चरित्रात सावित्रीबाई ह्या नायगाव ( ता. खण्डाळा, जि. सातारा ) येथील माळी पाटील यांची मुलगी असे नवे संशोधन व माहिती ग्राह्य धरली होती. मग आता खरे कोणते ?

भालेकर समग्र वाङ्मयाचे परीक्षण करण्यापूर्वी त्यांच्या रायकरकृत चरित्राची चिकित्सक लागूपुरती ओळख थोडक्यात करून देणे प्रथम जरूर वाटते. वाङ्मयाचे संदर्भ व अन्वयार्थ जाणण्यास मदत व्हावी, हा उद्देश आहे. चरित्र, वाङ्मय व कार्य यांच्यांत अन्योन्य संबंध असल्याने हा ग्रंथ म्हणजे या सर्वांची एकच मूर्त प्रतिमा झाली आहे. वाङ्मयाच्या प्रांतात तरी भालेकर हे "सत्यशोधक चळवळीतील महात्मा फुले यांचे सहकारी" हे मुखपृष्ठावरील एक शीर्षक वादातीत आहे. या समग्र वाङ्मयाचे एकूण दहा विभाग आहेत. 'चरित्रचर्चा' हीच प्रस्तावना झाली आहे.

भालेकरांचे शिक्षण ( म. फुल्यांच्या प्रमाणे ) मिशनरी शाळेत झाले. यामुळे नुसता 'धर्मासंबंधी खऱ्याखोटया गोष्टींचा शोध करण्याचा हव्यास लागला' असे स्वतः भालेकरांनी शेवटी नमूद केले आहे ( पृ. चार ). भालेकरांच्या घरी वारकरी संप्रदाय चालत आला होता. भांबुर्ड्याला जंगली महाराजांची ज्ञानेश्वरी चाले, तेथे कृष्णराव उपस्थित राहू लागले. वेदान्तात समता आहे, पण ऐकणारे शिष्य जातिभेद (विषमता) प्रत्यक्ष व्यवहारात पाळतात, याचा अनुभव आल्यामुळे प्रत्यक्ष जातिभेद मोडण्यासाठी निघालेल्या सत्यशोधक समाजास जाऊन मिळाले. जात्याच वाचनाचा छंद असल्यामुळे 'लोककल्याणेच्छू' व 'ज्ञानचक्षू' ही पुण्यात त्या काळात उपलब्ध असलेली पत्रे ते वाचू लागले. गणेश वासुदेव जोशी (सार्वजनिक काका) वगैरे ब्राह्मण समाजसेवकांशी जोतीरावांप्रमाणे भालेकरांचा प्रारंभी मैत्रीचा सहवास जडला; व त्यांनी भांबुर्ड्यास लायब्ररी काढली. ही सर्व पार्श्वभूमी पुढे त्यांना वाङ्मयसेवक होण्यास कारणीभूत झाली. उत्तम वक्तेही झाले. लोकहितवादी त्यांच्या सभेस अध्यक्ष होत असत (पृ. सहा). यांनी पुणे–उमरावती वगैरे ठिकाणी अनेक व्याख्यानेही दिली. यांचे जीवनध्येय त्यांनी रचलेल्या अभंगांतून सांगता येते–

"मी आपले शक्यनुसार, सांगेन बांधवा सुविचार, करीन उपदेश देईन आधार, हाचि निर्धार प्रतिज्ञेचा । शेवटी एक मागतो मागणे, दुःखाचे मूळ अज्ञान असणे, करीता विद्येचा प्रसार करणे, कृष्ण म्हणे न लगे दुसरे ॥" (पृ. १९)

## फुले–भालेकर मतभेद

वरीलप्रमाणे भालेकरांनी त्यांचे साठ वर्षांचे आयुष्य खर्ची घातले. जोतीरावांशी यांचा खाजगी व सार्वजनिक कार्यात संबंध आला. या दोघांनी 'कमर्शिअल व कॉंट्रॅक्टिंग कंपनी' काढली होती (पृ. ७). ह्या जवळिकीतून या दोघांचे पुढे सार्वजनिक कार्यातही वैयक्तिक खाजगी स्वभावभेदांमुळे मतभेद जाहीरपणे प्रगट झाले. प्रसिद्ध संशोधक श्री. य. दि. फडके यांनी हा कालांतराने दृष्टिआड झालेला विषय 'मौज' दिवाळी अंक १९७८ व ७९ मध्ये साधार सविस्तर मांडिला होता. भालेकर समग्र वाङ्मयातील पृष्ठ २४८ व इतरत्रही पुनरुक्तीने खुद्द भालेकरांच्याच शब्दांत ह्या वादाचे स्वरूप समजते. भालेकरांचे व्यक्तिमत्त्व व कार्य स्वावलंबी होते. जोतीरावांच्या विरोधाला न जुमानता स्वतःच्या हिंमतीवर यांनी बहुजनांचे पहिले साप्ताहिक 'दीनबंधु' १८७७ सालापासून काढले. निबंधमालाकारांनी जोतीरावांवर व स. शो. समाजावर या काळात जी टीका केली, तिला उत्तर दीनबंधूनेच दिले. संकीर्ण लिखाण, पत्रव्यवहार वगैरे, विशेषतः अंतःकाळचे उद्‌गार (पृष्ठ २०५ पहा), व ह्याच समग्र वाङ्मयातील १९९ ते २५४ ही पाने भालेकरांचे पुणे व उमरावती येथील कार्य व प्रचार, मतभेद, आत्मचरित्र वगैरे सर्व काही जरूर ती माहिती देतात. फार काय, 'भालेकर लिखाण' म्हणून १८१ ते १९८ पानांतूनही फुले-भालेकर मतभेदांचे स्वरूप त्यांच्या काळात जाहीर झालेले पुनः छापिले आहे. भालेकर यांनी सार्वजनिक हितार्थ अनेक खटाटोपी केल्या. अनेक उपक्रम हाती घेतले व चालेनासे झाले म्हणून सोडले. त्यांचा स्वभाव एकदम खर्चिकही होता. ह्या वैयक्तिक स्वभावदोषांमुळे 'फुले-भालेकर' हा समास न राहता जन्मभर विग्रहच राहिला ! दुही व फूट, मग ती अंतर्गत कोणत्याही कारणाने का असेना, ती चळवळीचे नुकसान करिते. फुले-भालेकर-लोखंडे वगैरे मनुष्येच होती; चुका झाल्या. टिळक-आगरकर, टिळक-गोखले, रानडे-टिळक, भांडारकर-टिळक वगैरे विद्वान वरिष्ठ मोठमोठ्यांत महाराष्ट्रात मोठमोठे वाद झाले. त्यांचे स्वरूप दृष्टिकोण, पक्ष व तत्त्वभेद यांवर आधारित होते. 'फुले-भालेकर' ह्या प्राकृत पुढाऱ्यांचे मतभेद वैयक्तिक स्वभावदोष व चुका यांतून निर्मित झाले. हा मूलभूत फरक आहे. फुले-भालेकरांची मते, पक्ष व समाज एकच राहिला. भालेकरांनी फुल्यांचे विचार जास्ती स्पष्ट करून, भर घालून, सुबोध, सुवाच्य बालबोध मराठीत प्रसृत केले. फुले वऱ्हाडात गेले नसावेत. पण उमरावती वगैरे भागात स. शो. समाजाचा प्रसार व प्रचार भालेकरांनी केला; ह्यांची सर्व कामगिरी पूरक झाली. एवढेच नव्हे तर भालेकरांचे भाचे कै. गणपतराव पाटील व दत्तक दिलेले चि. मुकुंदराव पाटील (तरवडी, जि. नगर) यांनी व पुढील सर्वच

स. शो. समाजाच्या कार्यकर्त्यांनी वरील सर्व दुर्दैवी दुही विसरून चळवळ सतत वाढविली. ही केवळ वैयक्तिक नव्हती आणि तिची सार्वजनिक गरज लोकांत होती म्हणून ती होऊन गेली. एवढेच म्हणता येते की, स. शोधक कार्यकर्ते निर्भिड होते; फटकळ होते. त्यांनी स्वकीय जोतीबा फुले, पुढील जाधवराव वगैरे सारख्यांची भीडभाड धरली नाही. प्रस्तावनेत संपादक रायकर यांनीही भालेकरांच्या लिखाणाला व विधानाला धरून पुष्कळ तटस्थपणे न्यायशील चर्चा केली आहे. हा सर्व ग्रंथ म्हणजे इ. स. १८६५ ते १९१० पर्यंतच्या सत्यशोधक चळवळीच्या इतिहासाचे महत्त्वाचे साधन ठरतो. भालेकरांची पुस्तके वेगवेगळी प्रसिद्ध झाली होती. आता हा ग्रंथ म्हणजे क्रमवार एकत्र संग्रह आहे.

## पोवाडे

'आमचे कारागीर', 'पूर्वीची व सांप्रतची स्थिती' हे दोन पोवाडे कष्टकरी लोकांची त्यावेळची अवस्था वर्णितात. भालेकर यांच्या ठायी चांगली काव्यशक्ती व निरीक्षणशक्ती होती. कलगीतुरा– शिवशक्ती व द्वैताद्वैत या विषयांवर पूर्वपक्ष व उत्तरपक्ष भेदिक गाणारे करीत असत. यापासून सामाजिक लाभ नाही, असे भालेकरांनी प्रतिपादिले आहे. स. शो. जलसे निघाल्यावर कित्येक ग्रामीण कलगीतुरेवाले लोकनाट्याकडे वळले. आता कलगीतुरा दिसत नाही. पुढील 'राघु गाडीवाना'चा पोवाडा शेतकरी ग्रामीण जीवनाचे चित्र हुबेहूब उभे करितो. लोकल फंडावरील दोन पोवाडे, शेतकरी लोकांची बाजू मांडतात. जोतीबांनी शेतकऱ्यांच्या अशा बाजू पुढे आणिल्या होत्या, त्यात भारदस्त व समर्पक–यथातथ्य भर घालून भालेकर गाण्यालायक काव्ये करिते झाले. विद्येचा महिमा, महत्त्व व जरुरी सांगून अफाट निरक्षर जनतेत विद्याप्रसार करणारी सत्यशोधक चळवळ होऊन गेली; व तिला खूप यशही लाभले.

## हितोपदेश

पृ. १२ ते १७ पानांत चवदा अभंग आहेत. 'सांगतो विद्या शिका। नका टिका करू व्यर्थ ॥' त्यावेळची शूद्रांची विकट अवस्था पद्यात वर्णिली आहे. पुरोहितवर्गाची पिळवणूक स्पष्टपणे सांगितली आहे. जोतीबात व निबंधमालेतही कोठे कोठे अश्लीलता आढळते. भालेकर यांचे गद्य–पद्य दोन्ही प्रसन्न व प्राज्ञ आहे. चार पदे हिंदीतदेखील रचिली आहेत. जातिभेदखंडण, विद्याप्रसार, दारिद्र्य-निवारण वगैरे गरीब जनतेचे प्रश्न मांडिले आहेत.

एकूण समग्र वाङ्मय शेतकऱ्यांच्या उत्थानासाठी व प्रगतीसाठी लिहिले आहे. सन १८७७ सालचा दारुण दुष्काळ पडल्यावर शूद्र शेतकरीवर्ग धुळीस मिळाला. यामुळे सत्यशोधक चळवळ ही उत्तरोत्तर खास शेतकरीचळवळ झाली. जोतीबांनी १८८३ साली 'असूड' हा शेतकऱ्यांसाठी लिहिला. तसेच पण स्वावलंबनाने १८८८ पासून भालेकरांनी चालू केलेल्या दीनमित्रातून विशेषतः या समग्र वाङ्मयाचा तसलाच बराच भाग प्रथम प्रसिद्ध झाला. यामुळे त्या काळात व नंतरही जरूर ती सामाजिक जागृती घडली.

## शेतकऱ्याचे मधुर गायन

हे ईशस्तवनाने सुरू होते. म. फुले यांच्याप्रमाणे भालेकरांवर एकेश्वरवादाचा पगडा होता. पाटीलकी ह्या काव्यात ते म्हणतात : म्हणे भालेकर शेतकऱ्यांची सर्वांआधी मूळ झोपडी । नंतर नगरे राजवाडे मूर्ती देवळे गाडी घोडी ॥ (पृ. २१). लोकवस्तीची मूळ सुरुवात शेतकऱ्याच्या झोपडीने झाली, असे सांगून शेतकऱ्यांची थोरवी भालेकर हिंदीत पद्य क्रमांकात गातात : सर्व जमीन मुलुख के मालिक खेतीवाले ठैरे हैं ॥ (पृ. २१). शेतकऱ्यांना उपदेश करण्यासाठी 'शेतकरी सेवक' भालेकर वाहिले होते. शेतकऱ्यांचे कठीण व बिकट जीवन वर्णितात. (पृ. ३०) शंकराचार्य, (पृ. २८) भट हाच शनी, (पृ. २४) पुजाऱ्या दुकान की तीर्थ, (पृ. २६) सोवळे ही गायने पुरोहितशाहीचे खंडन करितात. मागील व पुढील सर्वच काव्ये शेतकऱ्यांना उद्देशून आहेत. १८७७ सालचा भयंकर दुष्काळ व त्याचे वर्णन शहारे आणणारे आहे (पृ. ३७ ते ३९).

## उपदेशपर लावण्या

खरा पाटील (पृ. ३२) मारवाडी, मोठे शेठ सावकार, कुलकर्णी यांच्या पिळवणूकीचे स्वरूप भालेकर यांनी म. फुल्यांच्या सारखे पण अधिक वस्तुस्थिती वर्णन करणारे मांडले आहे. शिकलेला पाटीलच टिकेल व असावा. नाहीतर, अक्षरशत्रू







अनुक्रमणिका

पाटील हा बैल आहे, असे भालेकर उघड म्हणतात. ही व वरील सर्व काव्ये 'दीनमित्र' साप्ताहिकात १८८९ सालीच प्रसिद्ध झाली होती. यांच्या वेगवेगळ्या प्रसिद्ध झालेल्या पुस्तकांनी फार जागृती केली. मधुर गायन, पोवाडे, लावण्या हे सर्वच काव्य जिवंत ग्रामीण साहित्य ठरते. भालेकर स्वतः शेतकरी होते. ते त्यांच्या काही कवितांना 'श्रीखंड' म्हणतात (पृ. ४२ ते ४७ पहा). अंधश्रद्धा निर्मूलनासंबंधी देखील कविता आहे. उदा., कलीयुगाचे भय (पृ. ४७) इत्यादी. 'उपहास' हा अलंकार भालेकरात आहे, पण ती लोकहितवादी-फुले यांच्याइतका कडवा नाही.

## बळीबा पाटील ( कादंबरी : इ. स. १८८८ )

ह्या ग्रामीण कादंबरीची ओळख प्रारंभी श्री. रायकर व स्वतः भालेकर यांनी करून दिली आहे. ती मुळातून वाचावी. संवाद व वर्णने असल्यामुळे हिला कादंबरी म्हटली आहे.

अनेक वाङ्मयप्रकार असे भालेकरांनी हाताळले आहेत. शेतकऱ्यांत जागृती व्हावी व त्यांची सुधारणा व्हावी, हाच सर्वत्र हेतू आहे. याप्रमाणे भालेकरांच्या पुस्तकांच्या अनेक आवृत्त्या निघून त्यानी जागृती केली. पुढील व मागील काही सत्यशोधकांच्या पुस्तकांत शिवराळपणा व केवळ विरोधी द्वेष प्रगट झालेला आढळतो. पण 'भालेकर-साहित्य' याला अपवाद ठरते. त्या नांगऱ्या लेखकाने खरोखर मराठी भाषेची सेवा केली; व शेतकरीहितार्थ लेखणी झिजविली. भालेकर कर्मवीरदेखील होते. 'सुशिक्षणगृह' नावाचे शेतकरी मुलांसाठी पुण्यास बोर्डिंग काढले. दीनबंधु सार्वजनिक सभा काढली. शेतकऱ्यांचे प्रश्न सरकारपुढे मांडले. इ. स. १८९६ च्या कॉंग्रेस अधिवेशनापुढे शेतकरी पुतळा उभा केला. म. फुले यांचे कार्य त्यांच्या पश्चातही लेखन, भाषणे, प्रचार व संचार यांयोगे चालू ठेविले. हा लेखक आमरण वाङ्मयात स्थिरावला व रंगला. जवळ जवळ एका शतकानंतर भालेकरांचे अनुभवी वाङ्मय लोकांपुढे एकत्र येत आहे, याचा अर्थ त्याची जरुरी अद्याप आहे. हे श्रमिकांचे वाङ्मय होते व आहे. यात ग्रामीण कारागिरी बुडू नये म्हणून स्वदेशीचा पुरस्कार आहे. विणकर, कोळी-माळी-कुणबी वगैरे ( O. B. C. ) यांच्या अधिक मागासपणाची जाणीव झाली होती. संपादक रायकर यांनी भालेकरांच्या प्रत्येक पुस्तकाची पूर्वपीठिका, उद्देश वगैरे सर्व प्रस्तावनेत दिले आहेत; व पुढेही प्रत्येकारंभी जरूर तेवढी ओळख करून दिली आहे. वाचकांना ती मुळातून खात्रीने मार्गदर्शक होणारी आहे, अशी सोय केली आहेच. यावरून संपादकीय श्रम समजतात. प्रत्येक विभाग टापटिपीचा संपादिला आहे. बळीबा पाटील ही निबंधवजा कादंबरी आहे. कुणबी लोक विद्यामार्गी व्हावेत व ते पुढे यावेत म्हणून हा (पुनरुक्तिपूर्ण) प्रयत्न आहे. सक्तीच्या शिक्षणाची मागणीदेखील भालेकरांनी पुढे रेटली. स. शो. चळवळ सक्तीच्या शिक्षणाची प्रामुख्याने पुरस्कार करणारी चळवळ होती. या कादंबरीत लालित्यापेक्षा विचारविपुलता व वस्तुस्थितीची वर्णने अनेक आहेत.



## पंचखेळ

काळा, पांढरा, हिरवा, तांबडा व पिवळा अशा पाच रंगांचा हा पत्त्यांचा अपूर्व खेळ आहे. हा खेळ कसा खेळावा यासंबंधी प्रारंभी माहिती दिली आहे. शेतकऱ्यांच्या मुलांच्या उन्नतीसाठी १८८२ साली हा तयार केला. यातील म्हणी पृ. ११५ ते १२० अखेर दिल्या आहेत. त्या त्यांच्या मनोरंजनाबरोबर ज्ञान वाढविणाऱ्या आहेत. भालेकरांची "ओरिजिनॅलिटी" व्यक्त होते. स्त्रिया व मुले यांनीही हा खेळ ज्ञानवर्धनार्थ खेळावा अशी भालेकरांची अपेक्षा आहे (पृ. ११३).

## शास्त्राधार

हे संवादात्मक पुस्तक भालेकरांच्या वाङ्मयावरील कळस आहे. शास्त्राधाराचा 'बाऊ' करून जे शूद्रातिशूद्रांना स्वावलंबी धर्मकृत्यांत अडवत होते, त्यांच्यावर कायद्याच्या कोर्टात अनेक दावे जोशी बिल पास होईपर्यंत आणीत होते, तेच शास्त्राधार बाजूला ठेवून स्वतः कसे विरुद्ध वागतात हे बिनतोड युक्तिवादाने भालेकरांनी सिद्ध केले आहे. बुद्धिवादी असा हा प्रयत्न आहे. "... तुम्ही मात्र हवे तसे स्वतंत्रतेने वागावे आणि इतरांनी ( शूद्रातिशूद्रांनी) मात्र रूढीच्या पारतंत्र्यात नेहमी गुंतून

अनुक्रमणिका

पडावे हेच (तुमचे) शास्त्र आहे." असा शेवटी (पृ. १३६) सारांश दिला आहे. विसंगत शास्त्राधाराची त्यावेळची स्वार्थी व मतलबी पद्धतीची कल्पना येते. आता असा तोच काळ नाही. समाजपरिवर्तन किती झाले व किती होणे जरूर आहे, ह्याच्या फेर-तपासणीची ही वेळ आहे.

## ग्रंथविशेष

ह्या ग्रंथात गद्य-पद्य लेखन आहे, एवढेच नव्हे तर पृष्ठ १४१ ते १६२ अखेर 'भाषणे' देखील आहेत. 'कारखाने आणि व्यापार चालविणारी मंडळी' वऱ्हाडात भालेकरांनी सन १९०२ साली काढली. तिची आचार-विचारात जी आखणी केली होती, तिचे स्वरूप व कार्ययोजना वाचता येते. 'शेतकरी व उद्योग' असा विचार व कार्य दर्शविले आहे. शेती व शेतकरी आणि खेडेगावे यांचे आत्मपरीक्षण व निरीक्षण आहे, ते ताजे वाटेल.

जोतीबांनी त्यांच्या काळात फक्त 'ब्राह्मण' पिळतात, हे जास्ती उत्कटतेने दाखविले होते. भालेकरानी जास्ती शोध व बोध मांडिला आहे. स्पृश्य व अस्पृश्य बलुतेदारांना क्षत्रिय म्हणविणारे देखील पिळतात हे नवे सत्य निदर्शनास आणले आहे (पृ. १४९ व १६३ पहा). बलुतेदार प्रजा व अस्पृश्य–मांग, महार आणि वन्य जमाती यांच्या मागासपणाची जबाबदारी क्षत्रियांवरदेखील तितकीच भालेकरांनी लादली आहे. 'शेटजी' वर्गाला पिळणूकदारांत घातले आहे. यांत मारवाडी वगैरे येतात.

कष्टकरी शेतकऱ्यांच्या जमिनी ऐतखाऊ श्रीमंताकडे– पिळणाऱ्या वर्गाकडे– अव्वल इंग्रजीत जात चालल्या होत्या याची जागृती व कल्पना भालेकरांना पूर्ण होती. 'शेतकऱ्यांनो डोळे उघडा' हे भाषण १६५ पानापासून छापिले आहे. ते आजही चिंत्य आहे. "सावकार व (इंग्रजी) सरकार दोघे छळतात" (पृ. १८६). शेतकऱ्यांचे हित कशात आहे व अहित कशात आहे हेही सांगितले आहे.

सुशिक्षणगृह व रा. रा. जोतिराव फुले यांचा खोडसाळपणा, हे प्रकरण १८९ ते पृ. १९८ अखेरपर्यंत फुले-लोखंडे-भालेकर यांच्यांतील बेबनावाचे नग्न चित्र उभे करिते. भालेकरांचे फुल्यांशी द्वैत झाले, तसे लोखंडे (दीनबंधूकर्ते, मुंबई) यांच्याशीदेखील वाकडे आले. एकूण सत्यशोधक–ब्राह्मणेतर चळवळीचा प्रथमपासून शेवटपर्यंतचा इतिहास तपासता गृहकलहामुळेच ही चळवळ, तिच्यातील वृत्तपत्रे, संस्था, परिषदा वगैरे उपक्रम बुडाले! ह्या ग्रंथावरून हाच निष्कर्ष निघतो.

भालेकरात स्वपक्षाच्या आत्मपरीक्षणावर भर आहे. उदा., "ब्राह्मणांच्याच लबाड्या शोधणे म्हणजे सत्याचा शोध करणे व इतरांच्या लबाड्या शोधल्यास सत्याचा शोध लावणे होत नाही असे नाही. ब्राह्मणांच्या लबाड्या शोधणाऱ्यांकडून लबाड्या होत नाहीत काय? होत असतील तर त्या सुधारू नयेत काय?" (पृ. १९८) [शेतकऱ्याचा कैवारी दि. ३०।११।१८९३]

कामगारांचा प्रश्न मांडणारा कार्ल मार्क्स याच्याच समकाळात, शेतीप्रधान भारत देशातील शेतकऱ्यांचे प्रश्न फुले-भालेकर-लोखंडे मांडीत होते. तरी ही सर्वच सान्त मनुष्ये होती, हे जाणून त्यांच्यापुढे जाऊन यापुढे विवेक नवा करावा. "ब्राह्मणावर रागावण्याची कारणे" (पृ. २०२ ते २०४ अखेर) दिली होती. ही विरोधी व प्रतिकारप्रधान चळवळ महाराष्ट्रातच का निपजली होती, याला उत्तर-पेशवाई कशी जबाबदार होती हे पृ. २०४ वाचले असता समजू शकते. दलित चळवळीचे प्रणेते फुले व डॉ. आंबेडकर महाराष्ट्रातच का झाले, याचीही कल्पना येते. तो मागील जुलमी काळ आता दृष्टिआड होत आहे. जुलमाचे वर्णन भालेकरांनी पृ. २१३ वर केले आहे. पेशवाई झाली नसती, तर महाराष्ट्रातदेखील अशी प्रतिकारप्रधान चळवळ झाली नसती. असो.

## अंतकाळचे उद्गार व पत्रव्यवहार

कै. भालेकर यांनी शेवटी आत्मचरित्रपर टिपण लिहून ठेविले (पृ. २०४). सत्यशोधक समाजाचा झेंडा पुण्यातून भालेकरांनी मिरवणूक काढून मिरविला. मिरवणूकीत रानडे-भांडारकर आले होते. रानड्यांनी शेवटी सभेत भाषणही केले.

अनुक्रमणिका








" फडक्यांच्या बंडाच्या वेळी झगडा, जोतीबाचे वारंट ५० रु. देऊन चुकते केले " (पृ. २०७). जोतीबा व फडके मित्र होते व फडक्यांस गुप्तपणे जोतीबांनी साह्य केले, याला हा पुरावा मिळतो.

जोतीबांपासून काही कार्यकर्त्यांनी विग्रह घेतला. त्यांत भालेकर, डॉ. वि. रा. घोले व गंगाराम भाऊ म्हस्के आदिकरून मंडळी होती. न्या. रानडे यांनी या मंडळींना हाताशी धरून डेक्कन मराठा एज्यूकेशन असोसिएशन (पुणे) ही बहुजन समाजातील पहिली महत्त्वाची शैक्षणिक संस्था काढली.

" क्षत्रिय म्हणविणारे लोक ब्राह्मणांचे जोडीदार आहेत." (पृ. २२४). इतर (दलित) निराश्रित हिंदूंना उच्च म्हणविणारे देशमूखमराठे नीच समजून पिळतात याचे सामाजिक चित्र, जे जोतीबात नव्हते, ते भालेकरात उत्कटतेने पुनरुक्तीने आढळते (उदा., पृ. २३२ पहा). आजचा हा दलित प्रश्न शेतकरी मराठा ग्रामीण समाज व पूर्वास्पृश्य यांच्या मधला बनला आहे. महर्षि शिंदे यांच्या डि. सि. मिशनचे भालेकर वऱ्हाडमध्ये प्रचारक व प्रतिनिधी होऊन तिकडे अस्पृश्योद्धाराचे कार्य करण्यास गेले होते. पूर्वास्पृश्यांना ते निराश्रित हिंदू म्हणून संबोधित. अस्पृश्यतेचा अभ्यास व निरीक्षण जे त्यांनी लिहून ठेविले आहे, ते दलित प्रश्नाचा अभ्यास करणारांना उपयोगी आहे. भालेकरांची आर्थिक परिस्थिती ठीक असती, तर त्यांच्याकडून जास्ती समाजकार्य पार पडले असते. पृ. २३९ ते २५४ अखेरपर्यंत 'दीनबंधु' भालेकरांचा जो पत्रव्यवहार दिला आहे, तो इतिहास या दृष्टीने महत्त्वाचा आहे. काही काही सामाजिक कोडी उलगडण्यास मदत होते. डि. सि. मिशनचा व भालेकरांचा संबंध फार वर्षे राहू शकला नाही याची मीमांसा संपादक रायकर यांनी प्रस्तावनेत केली आहे. (पृ. २४). "Jack of all Trades and Master of none" असे फुले भालेकरांचे वर्णन करितात (म. फुले : समग्र ग्रंथ. पृ. ३०४). परंतु स्त्रीशूद्रातिशूद्रांच्या शाळा, बालकाश्रम, सत्सार नियतकालिक वगैरे काही नवे नवे उपक्रम जे जोतीबांनी चालू केले होते, ते अल्पावधीत बंद पडले. वर्तमानपत्र काढण्याचे धैर्य त्यांना झाले नाही. हे धैर्य प्रथम भालेकरांना झाले. जोतीबा प्रचारार्थ दूरवर परप्रांतांत गेले नव्हते. पण भालेकर वऱ्हाड, नागपूर, अमरावती वगैरे दूरदूरच्या ठिकाणी गेले व तेथे राहिले; वगैरे.

भालेकरांच्या अनेक उपक्रमांची शोकांतिका झाली; पण साहित्याची झाली नाही व होणार नाही. सामाजिक चळवळींचा संदर्भग्रंथ व अन्वयार्थ लाविण्यास मदत करणारा हा भालेकर समग्र वाङ्मय ग्रंथ महत्त्वाचा आहे.

## रानडयांच्या कार्यावर प्रकाश

हा ग्रंथ म्हणजे फक्त भालेकर यांचे चरित्र व वाङ्मय नव्हे. रानडे व जोतीराव फुले यांच्या स्वभावावर प्रकाश पडू शकतो. न्या. मू. रानडे यांनी ह्यांच्या चळवळीत भाग घेऊन तिला इष्ट शैक्षणिक विधायक वळण दिले. म्हस्के वकील व भालेकर, डॉ. विश्राम रामजी वगैरे जोतीबांपासून, या ना त्या कारणामुळे दूर गेलेल्यांना, एकत्र करून त्यांच्या साहाय्याने दयानंदांची पुण्यातील गाजलेली मिरवणूक पार पाडली. गरीब मराठा तत्सम विद्यार्थ्यांना स्कॉलरशिपा देण्याची कायमची सोय व व्यवस्था केली.

भालेकर यांनी त्यांचे भाचे गणपत सखाराम पाटील व सी. र. तारकुंडे यांना पुढे करून 'दीनबंधु फ्री स्कूल' १८८८ सालापासून चालू केले. रा. ब. रानडे यांनी खटपट करून ही बहुजनसमाजाची पहिली इंग्रजी शाळा रजिष्टर करून दिली. लोकहितवादींनीही सयाजीराव गायकवाड यांच्यांकडून मदत मिळवून दिली. पण शाळेचे चालक पाटील-नवलकर वगैरे ब्राह्मणद्वेष पसरवितात, या सबबीवर पुणे म्यु. कमिशनर रा. ब. जोगळेकर यांनी शाळेला मिळणारी मदतच बंद पाडली. स. शो. चळवळीला प्रथमपासून अखेरपर्यंत विरोध फार असे. पांढपेशांचा आज दलित चळवळीस पाठिंबा आहे. भालेकर व त्यांच्या मित्रांनी नानाविध उपक्रम केले; पण लो. टिळक व केसरी यांचा ह्या जानपद चळवळीशी संबंध कोठेच आलेला ह्या ग्रंथावरून दिसत नाही. रानडे-लोकहितवादी वगैरे मागील व पुढील कित्येक नेमस्तांनी ह्या चळवळीस खतपाणी घातले, यासंबंधीचे उल्लेख

अनेक मिळतात. लोकहितवादींची शतपत्रे फुले-लोखंडे-भालेकर यांना स्फूर्तिदायी झाली.

मात्र रानड्यांना ही सर्व कर्ती मंडली त्यांच्या प्रार्थना समाजात सामावून घेता आली नाहीत. भालेकर प्रा. समाजाला "मतलब सिंधु समाज" म्हणतात; याचे कारण अफाट अज्ञ जनतेला शिक्षित करण्याची काळजी प्रार्थना समाजाला नव्हती (प्रस्तावना पृ. दहा). "स्वबांधवांचे दुःखनिवारणार्थ झटणे हीच ईश्वरभक्ती होय" (पृ. तेरा) या दृष्टीने स. शो. समाज झटत होता.

## रानडे–फुले

फुल्यांचा भर पृथकतावादावर जास्ती होता; म्हणून ते संघर्षवादी वर्गविग्रही जास्ती होते. यामुळे वरिष्ठ वर्गाशी ते जास्ती असहकाराने वागले व लोकांना असहकार शिकविला. रानडे हे सर्वांगीण व सर्वस्पर्शी सुधारक होते. त्यांनी बहुजन समाजाच्या संस्थांना स्वतः आर्थिक मदत दिली व सयाजीरावांकडूनही मिळवून दिली. फुल्यांची चळवळ शिक्षणप्रसाराच्या बाबतीत पुढे जाण्यास रानडे–गोखले वगैरे नेमस्तांनी मदत केली. म्हणून शाहूमहाराज रानडे आणि गोखले यांना अतिशय मानीत. हा ग्रंथ म्हणजे शाहू महाराज सत्यशोधक चळवळ हाती घेईपर्यंतचा इतिहास आहे. वेदोक्त प्रकरणांचा भालेकरात उल्लेख नाही. सर्वसामान्य शेतकरी, सामान्य मराठे व कुणबी यांच्या दृष्टीने हा प्रश्न महत्त्वाचा नव्हता. रानडे–फुले यांच्या काळात प्रार्थना समाज व सत्यसमाजही "पाद्री मत" आहे असा समज लोकांत होता. परंतु उत्तरोत्तर इहवादी असे श्रमिकांचे प्रश्न हाती घेतल्यामुळे सत्यशोधक चळवळीसंबंधी हा गैरसमज राहिला नाही. जोतीबा तत्त्वचिंतक–धर्मचिंतक होते. त्यांनी "सार्वजनिक सत्यधर्म" हा मानवधर्म व्यक्त केला. सहकाऱ्यांशी मतभेद वगैरे उणिवा असतानाही त्यांचा संस्थापकीय मान, जेष्ठत्व व महात्मेपण इतिहासात व प्रत्यक्ष लोकांत सहीसलामत राहिले आहे. दलितांना त्यांची चळवळ यशस्वी व्हावी असे वाटत असेल, तर ह्या पूर्वचळवळीतील दोष तसेच दलित चळवळीत येऊ देऊ नयेत.

श्री. रायकर यांच्या प्रस्तावनेत सविस्तरपणे व निःपक्षपाती तटस्थ चर्चा व चिकित्सा भरपूर आहे. घोले, म्हस्के, भालेकर व लोखंडे जोतीबांशी मतभेद करिते झाले. कोणा एकास एकतर्फी दोषी ठरविता येत नाही. ह्या मतभेदांना प्रस्तावनेत व खुद्द समग्र ग्रंथात पुढे महत्त्व दिले आहे. पण वरील सर्वांनी जोतीबांच्या देखत व पाठीमागे सार्वजनिक कार्य चालवून ते एकूण बहुजन समाजाच्या उन्नतीस कारणीभूत झाले; चळवळ समष्टिप्रधान होती; एकटे जोतीरावच या चळवळीचे एकमेव संस्थापक व संवर्धक होते, असे नव्हे.

हिंदु-मुसलमानांच्या १८९६ सालच्या मुंबईतील दंग्यात लोखंडे यांनी सरकारची व मुसलमानांची बाजू घेतली. पण भालेकरांनी हिंदुधर्माभिमानाने फक्त हिंदूंची बाजू घेतली, यामुळे पोलीसखात्यानेही त्यांचा छळ केला. या संबंधाचे आत्मनिवेदन या ग्रंथात मिळते. याशिवाय या ग्रंथात हिंदुधर्म, समाज, हिंदूलोक यांच्या सुधारणेसंबंधी उघड ऊहापोह आहे. भालेकर हिंदुधर्माभिमानी असे समाजसुधारक व चळवळे होते.

सत्यशोधक चळवळ सर्व विद्येत मागासलेल्यांची होती. पण मराठी संस्थानिकांची मदत मिळवून अदूरदर्शी मराठा पुढाऱ्यांनी डे. म. एज्यू. असोसिएशन (पुणे) व अ. भा. मराठा शिक्षण परिषद, 'मराठा दीनबंधु' पत्र वगैरे चळवळ फक्त मराठासमाजाशीच निगडित केली; व ब्राह्मणेतर सत्यशोधक चळवळीत मराठा–मराठेतर वादाचे 'बी' स्वतःच रोविले. कोणत्याही व कुठल्याही बहुसंख्याक समाजाला अल्पसंख्याकांना धरून व बरोबर घेऊन पुढे जाता आले पाहिजे.

भालेकर स्वतःच लिहितात (पृ. २४४ पहा), "... फुले, भालेकर, लोखंडे यानी जे काही केले ते मराठ्यांतील विद्वान व धनवान यांनी पण केले नाही."

शेवटी भालेकरांकडून माळी समाजाची स्वतंत्र शिक्षण परिषद भरवावी असे विचार प्रतिपादन केले जातात (पृ २४४). कार्यानुभव सांगत सांगत पुनः आत्मचरित्र व आत्मनिवेदन वाचकापुढे ठेवून हा 'भालेकर ग्रंथ' समाप्त होतो.

– रा. ना. चव्हाण






अनुक्रमणिका

**बर्ट्रांड रसेल**– डॉ. सु. वा. बखले, मराठी तत्त्वज्ञान महाकोश मंडळ, फर्ग्युसन कॉलेज आवार, पुणे– ४११००४; १९८१; पृ. १६७ + आठ, किंमत रु. २५.

मराठी तत्त्वज्ञान महाकोश मंडळाने आपले कार्य महाकोशनिर्मितीवरच न थांबवता मराठी तत्त्वज्ञान ग्रंथमालेचा प्रकल्प हाती घेण्याचा निर्णय घेतला ही फार स्तुत्य गोष्ट आहे. साधारण १५० ते २०० पृष्ठांच्या मर्यादेत प्राचीन व अर्वाचीन, भारतीय आणि अभारतीय तत्त्वज्ञ, तत्त्वज्ञानातील विविध शाखा व संप्रदाय इत्यादींवर सुलभ भाषेत तत्त्वज्ञान विषयाच्या विद्यार्थ्यांसाठी आणि तत्त्वज्ञान विषयात रस असणाऱ्या सामान्य मराठी वाचकांसाठी ग्रंथ निर्माण करण्याची ही योजना आहे. डॉ. सु. वा. बखले यांचा 'बर्ट्रांड रसेल' हा या प्रकल्पातील पहिला ग्रंथ १९८१ मध्ये प्रकाशित झाला. डॉ. बखले यांनी या योजनेच्या अंतर्गत आपला हा ग्रंथ तत्परतेने लिहून दिल्याबद्दल त्यांचेही अभिनंदन !

ग्रंथाचे नाव 'बर्ट्रांड रसेल' असे मोघम असल्यामुळे साहजिकच त्यात रसेलचे जीवनचरित्र, जीवनकार्य तसेच तत्त्वज्ञान आणि इतर सामाजिक, राजकीय विषयांवरील मते त्यात वाचायला मिळतील अशा अपेक्षेने हे पुस्तक वाचायला घेतल्यास अपेक्षाभंग होईल. कारण त्यात फक्त रसेलच्या तत्त्वज्ञानाचीच चर्चा आहे. या दृष्टीने 'बर्ट्रांड रसेल यांचे तत्त्वज्ञान' हे नाव अधिक समर्पक ठरले असते. या मालिकेत तत्त्वज्ञांवर प्रकाशित होणाऱ्या या पुढील ग्रंथांच्या नावांबाबत हा विचार व्हावा, ही नम्र सूचना.

या ग्रंथातील डॉ. बखले यांची भाषा सोपी, सुबोध, सरल व प्रवाही आहे. तसेच विषय सोपा करून सांगण्यातही लेखकाने खूपच यश मिळवले आहे. रसेल यांनी तत्त्वज्ञानलेखन साठ वर्षांहून अधिक काळ केले आहे. तसेच त्यांनी तत्त्वज्ञानातील जवळजवळ सर्व शाखांत लिहिले आहे. एवढेच नव्हे, तर त्यांनी आपली मते अनेकदा बदलली आहेत. या सर्व गोष्टींमुळे रसेल यांच्या तत्त्वज्ञानावर ग्रंथ लिहिणे ही फार मोठी जोखमीची आणि कठीण गोष्ट आहे. उदाहरणार्थ, 'रसेल यांचे वस्तुमीमांसेतील मत काय होते ?' असे विचारल्यास त्याचे एक उत्तर देता येणार नाही. विविध कालखंडांत त्यांनी कोणकोणती मते स्वीकारली, हे सांगावे लागेल. या पार्श्वभूमीवर रसेल यांच्या तत्त्वज्ञानाच्या विविध शाखांतील मतांचा परिचय सोप्या भाषेत आणि तोही अवघ्या १५०–२०० पृष्ठसंख्येच्या मर्यादेत करणे किती अवघड आहे हे ध्यानात येईल. डॉ. बखले यांनी ही जोखीम व जबाबदारी स्वीकारली; एवढेच नव्हे, तर या ग्रंथमालेत सर्वप्रथम ग्रंथ पुरा करून मराठी वाचकांना सादर केला, याबद्दल ते खचितच कौतुकास पात्र आहेत. हे काम किती कठीण आहे याची लेखकाला जाणीव आहे हे त्याच्या निवेदनातील पहिल्या परिच्छेदावरून स्पष्ट होते. त्यात त्याने रसेलच्या तत्त्वज्ञानाची सखोल आणि विस्तीर्ण महासागराशी तुलना करून आपल्या लहान ओंजळीतून त्यातील पाणी वाचकांसमोर नेईपर्यंत पुष्कळसे गळून गेल्यावर जे शिल्लक राहिले, ते बिंदूइतके असल्याचे म्हटले आहे. ते म्हणतात, "रसेलचे सर्व तत्त्वज्ञान या ग्रंथात आहे असे म्हणण्याचे धाडस मी करणार नाही." हे खरेच आहे. गणिताचे तत्त्वज्ञान, सांकेतिक आकारशास्त्र, पाश्चात्त्य तत्त्वज्ञानाचा इतिहासविषयक विचार, धर्म व गूढवादविषयक मते, विज्ञानाचे तत्त्वज्ञान व विज्ञानविषयक मते, राजकीय तत्त्वज्ञान, शिक्षणविषयक मते इत्यादी अनेक विषयांवरील रसेल यांच्या विचारांचा या ग्रंथात ऊहापोह नाही. असा ऊहापोह करणे एवढ्या छोट्या ग्रंथात शक्यही नाही. तरीपण हे इतर विचारही अत्यंत महत्त्वाचे, उद्बोधक आणि विचारप्रवर्तक असल्यामुळे ते रसेल यांवर आणखी एक पूरक ग्रंथ प्रसिद्ध करून मराठी वाचकाला उपलब्ध करून द्यावेत, अशी मी मंडळाला विनंती करतो.

या ग्रंथात प्रामुख्याने रसेल यांच्या तत्त्वज्ञानविश्लेषणाचे स्वरूप, ज्ञानमीमांसा, भाषामीमांसा, नीति-तत्त्वज्ञान, वस्तुमीमांसा या विषयांवरील मतांची चर्चा आहे. त्याविषयी डॉ. बखले आपल्या निवेदनात लिहितात, "या पुस्तकातील तत्त्वज्ञान सर्व रसेलचे आहे असे मात्र मी म्हणू शकेन." या दृष्टीने रसेल यांच्या तत्त्वज्ञानाची लेखकाने या

अनुक्रमणिका

ग्रंथात जी चर्चा केली आहे, ती रसेल यांच्या विचारांशी कितपत प्रामाणिक आहे व कितपत प्रतारणा करते हे पाहण्याचा मी या परीक्षणात थोडक्यात प्रयत्न करीत आहे. प्रथम काही ढोबळ दोषस्थळे दाखवून नंतर प्रकरण २ आणि प्रकरण ५ या दोन प्रकरणांवर थोडे अधिक तपशीलवार लिहिणार आहे. कारण या दोन प्रकरणांतील विवेचनात अधिक दोष राहून गेले आहेत असे मला वाटते.

'प्रस्तावना' या पहिल्या प्रकरणात लेखक म्हणतो, "विट्गेन्स्टाइनच्या 'Tractatus'ने रसेल जितका प्रभावित झाला, तितका त्याच्या 'Philosophical Investigations' ने झाला झाला नाही." (पृ. १०) हे विधान बरोबर नाही; कारण विट्गेन्स्टाइनच्या या दुसऱ्या ग्रंथाने रसेल अजिबातच प्रभावित झालेला नाही. स्वतः रसेल याविषयी लिहितात, "His (Wittgenstein's) later doctrines as they appear in his *Philosophical Investigations* have not influenced me at all." (My Philosophical Development– page 112).

याच प्रकरणात पुढे पृ. ११ वर लेखक म्हणतो, "जे ज्ञान भाषेमध्ये व्यक्त होत नसते, होऊ शकत नाही ते ज्ञान अशक्य आहे असे आपण समजता कामा नये. भाषेमध्ये व्यक्त न झालेले ज्ञान शक्य आहे हे आपण लक्षात ठेवले पाहिजे." हा विचार गूढवादी वाटतो. गूढ अनुभव भाषेत व्यक्त करता येत नाही असे गूढवादी मानतात. हे विधान 'तार्किक आकारा' विषयी असेल, तर ते विट्गेन्स्टाइनच्या तार्किक गूढवादाचे द्योतक आहे. जग व भाषा यांमध्ये समान असलेला तार्किक आकार आपण भाषेमध्ये व्यक्त करू शकत नाही हे विट्गेन्स्टाइनचे मत रसेल नाकारतो, असा उल्लेख पृष्ठ ९ वरच आहे. रसेलला कोणत्याही तऱ्हेचा भाषेत व्यक्त न करता येणारा गूढवाद मान्य नव्हता. त्यामुळे रसेलच्या तत्त्वज्ञानाची प्रस्तावना म्हणून रसेलच्या विचाराशी विसंगत असलेले वरील विधान खटकते.

'समारोप' या शेवटच्या प्रकरणात डॉ. बखले लिहितात, "कांटच्या मते गणिताच्या विधानाची सत्यता अनुभवपूर्व आणि विश्लेषणात्मक असते." (पृ. १४७). मला वाटते येथे 'विश्लेषणात्मक' हे चुकीने पडलेले असावे. कारण कान्टच्या मते गणितीय विधाने संश्लेषणात्मक अनुभवपूर्व (Synthetic a priori) आहेत.

'अनुभववाद' या चवथ्या प्रकरणात निगामी अनुमानाच्या स्वरूपाविषयी आणि निगामी व विगामी अनुमानांतील भेदाविषयी लेखकाची खालील विधाने चुकीची वाटतात. (१) "आधारविधाने सत्य आहेत किंवा नाहीत याचा विचार निगामी अनुमानात करण्यात येत नाही." (२) "विधानांच्या सत्यासत्यतेचा विचार निगामी अनुमानात होत नसल्यामुळे आधारविधाने आणि निष्कर्ष यांतील संबंध केवळ आकारिक असतो. (३) तो वस्तुस्थितीविषयी काहीही सांगत नाही-" (पृ.५३) (४) "परंतु आधारविधाने सत्य आहेत किंवा नाहीत याचा विचार विगामी अनुमानात प्रामुख्याने केला जातो. (५) म्हणूनच विगामी अनुमान हे आनुभविक विधानांवर अवलंबून असते, आणि म्हणून यांतील विधानांचा संबंध आकारिक नसतो, तर तो अनुभवाधारित असतो, आणि (६) म्हणून तो वस्तुस्थितीविषयी काहीतरी सांगत असतो" (पृ. ५३-५४).

निगामी अनुमानाच्या स्वरूपाविषयीची वरील १ ते ३ ही तीनही विधाने चुकीची आहेत. या चुकीचे मूळ inference आणि implication यांमध्ये लेखकाने केलेली गल्लत हे आहे, समजा, 'प' आणि 'फ' ही दोन विधाने आहेत. आता मी जेव्हा 'प ने फ व्यंजित होते' (p implies q) असे म्हणतो, तेव्हा मी प किंवा फ च्या सत्यासत्यतेविषयी काही प्रतिपादीत नसतो. मी एवढेच म्हणत असतो, की 'प सत्य आहे व फ असत्य आहे' असे नाही. (It is not the case that p is true and q false); म्हणजेच 'प असत्य आहे किंवा फ सत्य आहे" ($\sim q \vee q$). परंतु मी जेव्हा "प म्हणून फ" असे निगामी अनुमान करतो, तेव्हा मी दोन गोष्टी प्रतिपादीत असतो : (१) प ने फ व्यंजित होते आणि (२) प सत्य आहे. म्हणजेच निगामी अनुमानात प ची सत्यता आपण प्रतिपादीत असतो. माझे हे म्हणणे बरोबर

असेल तर डॉ. बखले यांचे निगामी अनुमानाविषयीचे वरील पहिले विधान चूक ठरते.

आता त्यांच्या दुसऱ्या विधानाकडे वळू. निगामी अनुमानात आधारविधाने व निष्कर्ष यांतील संबंध आकारिक असतो यात वाद नाही. विधानांतील संबंध आकारिक असतो याचा अर्थ आधारविधान किंवा आधारविधाने निष्कर्ष व्यंजित करतात. म्हणजेच वर म्हटल्याप्रमाणे, त्यांतील संबंध असा असतो, की आधारविधाने सत्य व निष्कर्ष असत्य असे नसते. पण आधारविधानाच्या सत्यासत्यतेविषयी विचार केल्यामुळे किंवा त्याची माहिती/ज्ञान असल्यामुळे या आकारिक संबंधात आडकाठी येत नाही. असे असल्यामुळे डॉ. बखले यांचे दुसरे विधान– 'आधारविधानांच्या सत्यासत्यतेचा विचार निगामी अनुमानात होत **नसल्यामुळे** (जाड ठसा माझा) त्यांतील संबंध आकारिक असतात' हे विधान– बरोबर नाही.

निगामी अनुमानाचा निष्कर्ष वस्तुस्थितीविषयी काहीही सांगत नाही, हे डॉ. बखले यांचे तिसरे विधानही चूक आहे. कारण निगामी अनुमानाचे निष्कर्ष विश्लेषक विधाने वा तदुक्तीच असली पाहिजेत किंवा असतात असे नाही. "क लाल आहे म्हणून क रंगीत आहे" या निगामी अनुमानाचा निष्कर्ष वस्तुस्थितीविषयी म्हणजे क विषयी काहीही सांगत नाही, असे म्हणणे बरोबर नाही. कारण क रंगीत असल्याचे तो सांगतो. 'क रंगीत आहे' हे विश्लेषक विधान किंवा तदुक्ती नाही. "सर्व माणसे मर्त्य आहेत, सॉक्रेटिस माणूस आहे, म्हणून सॉक्रेटिस मर्त्य आहे" या निगामी अनुमानाचा निष्कर्ष वस्तुस्थितीविषयक विधान आहे. म्हणून डॉ. बखले यांचे तिसरे विधानही चूक वाटते. कदाचित डॉ. बखले यांना असे म्हणायचे असेल, की निगामी अनुमानाचा निष्कर्ष आधारविधानात जे सांगितले जाते त्याहून अधिक किंवा नवीन काही सांगत नाही. हा मिल'ने निगामी अनुमानावर घेतलेला आक्षेप आहे. तार्किक अनिवार्यता आणि ज्ञानशास्त्रीय अनागतता किंवा नावीन्य या दोन्ही गोष्टी एकसमयावच्छेदेकरून साधता येत नाहीत. परंतु त्यांना जर हे सांगायचे असेल, तर त्यांच्या वरील तिसऱ्या विधानाने ते बरोबर व्यक्त होत नाही.

हे माझे विवेचन बरोबर असेल, तर (१) निगामी अनुमानात आधारविधानांच्या सत्यासत्यतेचा विचार केला जात नाही, पण विगामी अनुमानात तो प्रामुख्याने होतो; (२) तसा विचार होत नसल्यामुळे निगामी अनुमानातील आधार-विधाने व निष्कर्ष यांतील संबंध आकारिक आहे व तसा विचार होत असल्यामुळे विगामी अनुमानात आधार–विधाने व निष्कर्ष यांतील संबंध आकारिक नाही; आणि (३) निगामी अनुमानाचा निष्कर्ष वस्तुस्थितीविषयी काहीही सांगत नाही, परंतु विगामी अनुमानाचा निष्कर्ष वस्तुस्थितीविषयी काहीतरी सांगतो, ही डॉ. बखले यांनी सांगितलेली निगामी व विगामी अनुमानांतील तिन्ही भेदलक्षणे समर्पक वाटत नाहीत. निगामी अनुमानात आधारविधाने निष्कर्ष संभाव्य असल्याचे दाखवितात, हेच या दोन अनुमानांतील प्रमुख भेदलक्षण आहे.

या पुस्तकात अशा काही संदिग्धता, छोट्या चुका व त्रुटी आढळतात; परंतु पूर्वी म्हटल्याप्रमाणे प्रकरण २ व प्रकरण ५ या दोन प्रकरणांत अधिक प्रमाणात दोष असल्यामुळे या दोन प्रकरणांचा थोड्या तपशीलात विचार करू.

'तत्त्वज्ञानाचे स्वरूप' या दुसऱ्या प्रकरणात पृ. १७ वर रसेल तत्त्वज्ञानाला गणितीय आधार देण्याचा प्रयत्न करतो असे लेखक म्हणतो. रसेलच्या मते तत्त्वज्ञानात तर्कशास्त्राला महत्त्वाचे स्थान आहे. तसेच गणित तर्कशास्त्रावर अवलंबून आहे; नव्हे, ते तर्कशास्त्रात रूपांतरित करता येते, असे रसेल मानतात. परंतु तत्त्वज्ञानाला तर्कशास्त्राचा आधार देणे म्हणजे गणिताचा आधार देणे असे यावरून निष्पन्न होत नाही. तत्त्वज्ञानाला गणितीय आधार देण्याचे रसेल म्हणत असल्याचे वाटत नाही. म्हणून लेखकाचे हे विधान खटकले.

रसेल तत्त्वज्ञानात मुख्यतः दोन विश्लेषणपद्धतींचा अवलंब करतो. त्या दोन पद्धतींना डॉ. बखले (१) 'विश्लेषणाची पद्धती' आणि (२) 'ओकॅमचा वस्त्रा चालविणे' असे म्हणतात

आणि पुढे लिहितात, "विश्लेषणपद्धतीला रसेल 'तार्किक परमाणुवाद' असे म्हणतो." (पृ. १८). परंतु "तार्किक परमाणुवाद" ही एक तत्त्वज्ञानीय किंवा तत्त्वमीमांसेतील उपपत्ती आहे. ती पद्धती नाही. शिवाय रसेलच्या दोन्ही पद्धती विश्लेषण-पद्धतीच आहेत. त्यामुळे एकीलाच विश्लेषणपद्धती म्हणणे गैरसमज करणारे आहे. म्हणून रसेल ज्या दोन विश्लेषणपद्धती वापरतो त्यांना अनुक्रमे (१) निश्चित वर्णनाची विश्लेषणपद्धती आणि (२) तार्किक रचनापद्धती असे म्हणणे अधिक संयुक्तिक ठरले असते, असे वाटते. पहिलीस 'समस्तरीय विश्लेषण' आणि दुसरीस 'विषमस्तरीय किंवा नवस्तरीय विश्लेषण' असेही म्हटले गेले आहे. 'फ्रान्सच्या सध्याच्या राजाला टक्कल आहे' याचे विश्लेषण करताना या वाक्याचे तार्किक विश्लेषण स्पष्ट केले जाते; परंतु टेबल किंवा खुर्ची या जडवस्तूंचे जेव्हा संवेद्यांच्या भाषेत विश्लेषण केले जाते, तेव्हा जडवस्तूच्या स्तरावरून आपण संवेद्यांच्या स्तरावर जातो. दुसऱ्या पद्धतीत ओकॅमचा वस्त्रा चालविला जातो.

तार्किक परमाणुवाद विश्लेषणपद्धतीचा अवलंब करतो. परंतु हे विश्लेषण भौतिक किंवा प्रायोगिक नसून तार्किक आहे. अर्थात तार्किक विश्लेषण हे फक्त भाषेचेच करता येते हा, पुढे व्हिट्गेन्स्टाईनी मांडलेला विचार रसेल मांडीत नाहीत. हे येथे निदर्शनास आणण्याचे कारण डॉ. बखले पृ. १९ वर तार्किक परमाणुवादाच्या विश्लेषणपद्धतीचे स्वरूप स्पष्ट करतात, तेव्हा त्यांच्या लिखाणाचा सूर असा दिसतो, की हे तार्किक विश्लेषण फक्त भाषेचेच आहे. ते म्हणतात, "बाह्य जगाविषयी अथवा आंतरिक जगाविषयीसुद्धा जेव्हा आपण बोलत असतो, जेव्हा आपण वर्णन करीत असतो, तेव्हा जी भाषा आपण वापरीत असतो त्या भाषेचे विश्लेषण करता येते. आणि असे विश्लेषण करता करता ज्या अंतिम घटकांपर्यंत आपण जाऊन पोहोचू शकतो, त्या घटकांनाही 'परमाणू' म्हणता येईल. हाच अर्थ रसेलला अभिप्रेत आहे" ... "विश्लेषणाच्या पद्धतीने भाषेतील (जाड ठसा माझा) अंतिम घटक 'परमाणू' प्राप्त होऊ शकतात हे स्पष्ट आहे." या वाक्यांवरून असे वाटण्याची शक्यता आहे, की रसेलच्या मते तार्किक विश्लेषण फक्त भाषेचेच करता येते. पण हा गैरसमज होईल. रसेलच्या मते तार्किक विश्लेषण हे भाषेचे तसेच वस्तुस्थितीचेही करता येते. वस्तुस्थितीलासुद्धा तार्किक आकृतिबंध असतो. म्हणून रसेल आपल्या तार्किक परमाणुवादामध्ये भाषेचे तसेच वस्तुस्थितीचेही तार्किक विश्लेषण करतो. व्यामिश्र वस्तुस्थितींचे तार्किक विश्लेषण केल्यावर आपण पारमाण्विक वस्तुस्थितीपर्यंत येऊन पोहोचतो. पारमाण्विक वस्तुस्थितीचे विश्लेषण वस्तुस्थितीत होऊ शकत नाही. कारण तिचे घटक वस्तुस्थिती नसतात. तरीही अशा पारमाण्विक वस्तुस्थितीचे विश्लेषण तिच्या घटकात करता येते. असे. विश्लेषण केल्यास आपल्याला 'विशेष', 'गुणधर्म' किंवा 'संबंध' उपलब्ध होतात. हे 'विशेष' हेच 'तार्किक परमाणू' होत; परंतु डॉ. बखल्यांच्या वर उद्धृत केलेल्या विवेचनात 'परमाणू' हे भाषेतील अंतिम घटक असे म्हटले आहे, हे बरोबर नाही. वस्तुस्थितीच्या तार्किक विश्लेषणाद्वारा परमाणु—विशेष उपलब्ध होतात. भाषेच्या तार्किक विश्लेषणाद्वारा उपलब्ध होतात ती 'तार्किक विशेषनामे' आणि 'गुणवाचक किंवा संबंधवाचक सामान्य पदे किंवा शब्द'. पृ. १९ वरील विवेचनात हा मुद्दा स्पष्ट होत नाही.

वस्तुस्थितीचे तसेच भाषेचेही विश्लेषण करता येते, हे रसेलचे मत डॉ. बखले यांनी पृ. २१ वर स्पष्ट केले आहे. परंतु येथे दोन गोष्टी खटकतात. (१) मी पुढे उद्धृत करीत असलेल्या पृ. २१ वरील वाक्याचा अर्थ स्पष्ट नाही. "'वस्तुस्थिती' आणि 'विधान' या विश्लेषणाच्या पद्धतीचा उपयोग करून रसेल ज्या निष्कर्षाला येतो, ते असे सांगता येतील." 'वस्तुस्थिती' व 'विधान' या विश्लेषण-पद्धती आहेत असा याचा वरकरणी अर्थ होतो; परंतु डॉ. बखले यांना असे म्हणायचे नसणार. या, म्हणजे तार्किक विश्लेषणपद्धतीचा अवलंब करून असे वाक्य केले तर "वस्तुस्थिती" आणि "विधान" हा भाग वाक्यात बसत नाही. तेव्हा डॉ. बखले यांना असे म्हणायचे असावे, की "वस्तुस्थिती व विधान यांचे तार्किक विश्लेषण करून रसेल ज्या निष्कर्षाला येतो, ते असे सांगता येतील."

परंतु मूळ वाक्यात काहीतरी चूक राहिली आहे. (२) हे वाक्य स्पष्ट नाही ही एवढी महत्त्वाची चूक नाही. परंतु डॉ. बखले यांनी त्याच पृष्ठावर ४(अ) आणि ब हे निष्कर्ष दिले आहेत ते अचूकपणे मांडले गेले नाहीत. ते म्हणतात, "पारमाण्विक वस्तुस्थिती-मध्ये **एक विशेष** आणि **एकच गुण** राहू शकतो. पारमाण्विक विधानामध्ये एक तार्किक विशेषनाम आणि एकच विधेय राहू शकते." हे निष्कर्ष काटे-कोर व अचूक नाहीत. कारण पारमाण्विक वस्तु-स्थितीमध्ये एक विशेष आणि एक गुण किंवा एक संबंध आणि दोन किंवा अधिक विशेष राहू शकतात. [उदा. Fa, aRb, R (a, b, c) येथे F हा गुण व a हा विशेष, R हा संबंध आणि a, b, c हे विशेष आहेत.] तसेच पारमाण्विक विधानात एक विशेषनाम आणि एक विधेय किंवा एक संबंधवाचक शब्द आणि दोन किंवा अधिक तार्किक विशेषनामे असू शकतात.

पृ. २१ वरील ही त्रुटी डॉ. बखले यांनी पृ. २३ वर भरून काढण्याचा प्रयत्न केला आहे. 'प्रयत्न केला आहे' असे म्हणण्याचे कारण तेथेही गुणवाची व संबंधवाची असे विधेयाचे किंवा वर्णनाचे दोन प्रकार दाखवले असले तरी द्विपदी, त्रिपदी किंवा अनेकपदी संबंधवाची शब्द असेल तर दोन, तीन किंवा अनेक तार्किक विशेषनामे परिमाण्विक विधा-नात असावी लागतात, हा मुद्दा त्यांनी स्पष्ट केलेला नाही. याशिवाय त्यांनी या तक्त्यात पारमाण्विक वस्तुस्थितीचे तार्किक विश्लेषण केल्यास एक विशेष व एक गुण किंवा द्विपदी वा अनेकपदी संबंध व त्यानुसार दोन किंवा अनेक विशेष उपलब्ध होतात हे दाखवलेच नाही. एवढेच नव्हे, तर पृ. २१ वर तार्किक विश्लेषण वस्तू किंवा व्यक्ती यांचे नसून वस्तुस्थितीचे असते असे त्यांनी प्रतिपादन केले होते ते विसरून किंवा त्याच्या विरोधी प्रतिपादन ते पृ. २३ वरील तक्त्यात करतात. पृ. २३ वरील तक्त्याचा 'अ' भाग पुढीलप्रमाणे :



जगाचे विश्लेषण—




या ऐवजी ते खालीलप्रमाणे पाहिजे —

जग=व्यामिश्र किंवा आण्विक वस्तुस्थितींचा समुदाय




असे लिहिल्यास पृ. २३ वरील तक्त्याचा 'अ' भाग पृ. २१ वरील विवेचनाशी आणि पृ. २३ वरील तक्त्याच्या 'ब' भागाशी सुसंगत होईल. तक्त्यातील 'ब' भाग पुढीलप्रमाणे आहे :

भाषेचे विश्लेषण–




यात थोडा बदल करून तो खालीलप्रमाणे असता तर अधिक स्पष्ट व निःसंदिग्ध झाला असता :

अनुक्रमणिका




व्यक्ती किंवा वस्तू या तार्किक रचना आहेत असे मानू लागल्यावर रसेल तार्किक रचनापद्धतीनुसार त्यांचे विश्लेषण वेद्यांत करतो.

'भाषामीमांसा' या पाचव्या प्रकरणात 'वाक्य' व 'विधान' यांत रसेल भेद करतो असे सांगून त्याचे स्पष्टीकरण देताना डॉ. बखले लिहितात– "वाक्य हे सत्य अथवा असत्य नसते, केवळ विधानेच सत्य वा असत्य असतात." (पृ. ६५). या विधानाच्या पुष्टयर्थ आज्ञार्थक वाक्याचे उदाहरण देऊन त्याला सत्यासत्यता नाही असे ते सांगतात. परंतु मला वाटते, येथे सर्व प्रकारच्या वाक्यांना– म्हणजे प्रश्न, आज्ञा, विनंती, उद्‌गारवाचक वाक्यांना– सत्यासत्यता असते का ? हा खरा प्रश्न नाही. डॉ. बखले म्हणतात त्याप्रमाणे "आज्ञार्थक वाक्य सत्य आहे किंवा नाही हा प्रश्नच उपस्थित होऊ शकणार नाही." (पृ. ६५). मग खरा प्रश्न आहे तो हा, की 'सत्य' किंवा 'असत्य' ही विशेषणे बोधात्मक वाक्यांना– म्हणजे जी वाक्ये विधाने व्यक्त करतात अशा वाक्यांना– लावायची, की ती वाक्ये व्यक्त करीत असलेल्या विधानांना लावायची ? (जर सत्य किंवा असत्य ही विशेषणे वाक्यांना लावता येत असतील तर 'विधान' ही संकल्पना अनावश्यक ठरेल. 'वाक्य' व 'विधान' अशा दोन पदांची गरज उरणार नाही.) परंतु डॉ. बखले यांना हा प्रश्न भावला नसावा आणि भावला असेल तर त्यांनी त्याचे दिलेले उत्तर फारच संदिग्ध व गोंधळात टाकणारे आहे. डॉ. बखले म्हणतात, केवळ वस्तुस्थितिदर्शक वाक्येच विधाने व्यक्त करीत असल्याने ती सत्य अथवा असत्य राहू शकतात." (तत्रैव) येथे 'ती' म्हणजे वाक्ये की विधाने ? वाक्यरचनेवरून 'ती' हे सर्वनाम वाक्यांचा निर्देश करीत असावे असे दिसते. परंतु लगेचच पुढील वाक्यात ते आपला निष्कर्ष सांगताना म्हणतात, "थोडक्यात, सत्यासत्यता ही मूल्ये विधानांची असतात, वाक्यांची नव्हे." (पृ. ६५).

यावरून हे स्पष्ट आहे, की विधाने सत्य किंवा असत्य असतात, वाक्ये सत्य किंवा असत्य आहेत असे म्हणणे गैर आहे हे रसेलचे मत डॉ. बखले येथे प्रतिपादन करीत आहेत. परंतु आज्ञार्थक, प्रश्नार्थक, उद्‌गारवाचक वाक्यांना सत्यासत्यता नसते यावरून कोणत्याच वाक्याला म्हणजे बोधात्मक वाक्यालासुद्धा सत्यासत्यता नसते असे निष्पन्न होत नाही. तात्पर्य, सत्यासत्यता ही मूल्ये बोधात्मक वाक्यांना का लावता येत नाहीत व त्या वाक्यांद्वारे व्यक्त होणाऱ्या विधानांनाच सत्यासत्यता का लावायची याविषयी कोणतीही कारणमीमांसा किंवा युक्तिवाद आपल्याला डॉ. बखले यांच्या विवेचनात आढळत नाही.

यानंतर लेखक 'विधानांचा अर्थ' आणि 'विधानांची सत्यासत्यता' यांमध्ये भेद असल्याचा उल्लेख करून "त्याचे स्पष्टीकरण करण्यापूर्वी विधानाचे स्वरूप काय असते" हे समजावून सांगतो. परंतु विधानाच्या स्वरूपाचे विवेचन झाल्यावरही या भेदाचे स्पष्टीकरण मला कोठे आढळले नाही.

विधानाच्या स्वरूपाची चर्चा करताना पृ. ६७ वर लेखक म्हणतो, "विधान ही काही वस्तू नाही, तर ती एक तार्किक रचना आहे असे रसेल समजतो." परंतु 'वस्तू' व 'तार्किक रचना' या विरोधी संकल्पना आहेत असे मानता येईल का ? तसे मानले तर "वस्तू अथवा व्यक्ती वास्तविक तार्किक रचना आहेत" या पृ. २१ वरील विधानाचे व प्रकरण ७ मधील वस्तुमीमांसेचे काय ?

'तार्किक रचना' या संकल्पनेविषयी कदाचित रसेलच्या मतातच गोंधळ असण्याची शक्यता आहे.

परंतु तसा गोंधळ असल्यास तो निदर्शनास आणून द्यायला हवा. 'तार्किक रचना' याचा अर्थ (१) 'काल्पनिक पदार्थ किंवा मिथ्या वस्तू' असा घ्यायचा, की (२) तो एक संज्ञेचा प्रकार समजायचा? डॉ. बखले यांना पहिला अर्थ अभिप्रेत असावा असे दिसते. असे म्हणण्याची कारणे दोन— (१) विधान ही टेबल, खुर्ची यांसारखी वस्तू नाही असे डॉ. बखले (व कदाचित रसेलसुद्धा) मानत असावेत. (२) 'तार्किक रचना' व त्यांचा भाषेत उल्लेख करण्यासाठी वापरली जाणारी संज्ञा यांत रसेल भेद करतो असे डॉ. बखले सांगतात. ते म्हणतात, "तार्किक रचनांचा भाषेत उल्लेख करण्यासाठी जे शब्द अथवा शब्दप्रयोग वापरण्यात येतात, त्यांना रसेल 'अपूर्ण चिन्ह' अथवा 'अपूर्ण संकेत' असे म्हणतो." (पृ. ६७-६८). विधान टेबल-खुर्चीसारखी वस्तू नाही हे म्हणणे बरोबर आहे. परंतु म्हणून तार्किक रचना म्हणजे मिथ्या किंवा काल्पनिक पदार्थ असा अर्थ घेतला तर टेबल, खुर्ची, गोविंदा या वस्तू व व्यक्ती तार्किक रचना आहेत असे म्हटल्यास ते काल्पनिक किंवा मिथ्या पदार्थ ठरतील. हे रसेल व डॉ. बखले स्वीकारतील काय?

डॉ. बखले यांनी पुढे विधानाचा विचार करताना 'संज्ञा' अथवा 'संकेत' असा शब्द न वापरता 'चिन्ह' शब्द वापरला आहे. 'चिन्ह' शब्द फार संदिग्ध आहे "आज पावसाचे चिन्ह दिसत आहे" आणि "वस्तुभाषेतील वस्तु-शब्द हेही चिन्हेच असतात" या दोन वाक्यांतील 'चिन्ह' शब्द एकार्थवाची नाहीत. पहिल्या वाक्यातील 'चिन्ह' शब्द इंग्रजी 'sign' या अर्थी आहे, तर दुसऱ्या वाक्यात तो 'symbol' या अर्थी आहे. ही संदिग्धता टाळण्यासाठी 'चिन्ह' व 'संज्ञा' हे भिन्न भिन्न शब्द वापरणे योग्य झाले असते व ते सुलभही होते.

डॉ. बखले शब्दचिन्हांचे 'सरल-चिन्ह' आणि 'व्यामिश्र-चिन्ह' असे दोन प्रमुख प्रकार सांगून 'लाल' व 'लाल फूल' ही अनुक्रमे सरल-चिन्ह व व्यामिश्र चिन्ह यांची उदाहरणे देतात. "ज्या शब्द-चिन्हांचे विश्लेषण होऊ शकत नाही अशा सरल-चिन्हांना रसेल 'विशेषनाम' असे म्हणतो तर ज्या शब्द-चिन्हांचे विश्लेषण होऊ शकते अशा चिन्हांना रसेल 'वर्णने' असे म्हणतो" असे सांगून "'लाल' हे विशेषनाम आहे तर 'लाल-फूल' हे वर्णन आहे" असा ते निष्कर्ष काढतात. (पृ. ६९). परंतु हा निष्कर्ष चुकीचा वाटतो. 'सर वॉल्टर स्कॉट', 'महात्मा गांधी' ही व्यामिश्र चिन्हे असली तरी ती विशेषनामे आहेत आणि 'लाल', 'गोड', 'गोल', 'मऊ' इत्यादी सरल चिन्हे असली तरी ती विशेषनामे नसून वर्णने आहेत. डॉ. बखले यांनी विशेषनामाचे जे निकष दिले आहेत त्यांनुसारही 'लाल' हे विशेषनाम ठरत नाही. डॉ. बखले म्हणतात, "विशेषनाम म्हणजे असे नाम किंवा नाव, की ज्याचा उपयोग विशिष्ट व्यक्तीचा अथवा वस्तूचा निर्देश करण्यासाठी केला जातो..." हेच तर्कशास्त्राच्या परिभाषेत ते असे सांगतात, "जेव्हा एखाद्या वस्तूविषयी अथवा व्यक्तीविषयी आपण बोलतो तेव्हा ज्या शब्दाच्या साहाय्याने आपण त्या वस्तूचा अथवा व्यक्तीचा निर्देश करू, त्या शब्दाला 'उद्देश्य' म्हणू. म्हणजे तो शब्द उद्देश्याच्या जागी आपण लिहू. असा जो शब्द असतो त्याला विशेषनाम म्हणता येईल." (पृ. ६९)

डॉ. बखले यांनी सांगितलेला वरील निकष लावल्यास 'लाल' या शब्दाला विशेषनाम म्हणता येणार नाही. कारण 'लाल' हा शब्द विशिष्ट वस्तूचा अथवा व्यक्तीचा निर्देश करण्यासाठी वापरला जात नसून निर्दिष्ट वस्तूचे वर्णन करण्यासाठी वापरला जातो. तसेच तो उद्देश्याच्या जागीही वापरता येत नाही. येथे एक गोष्ट स्पष्ट करायला हवी. ती ही, की व्याकरणाच्या नियमानुसार वर्णने उद्देश्याच्या जागी योजिली जातात. परंतु येथे आपल्याला कर्तव्य आहे ते तार्किक उद्देश्य व तार्किक विधेय यांच्याशी. विशेषनामच फक्त तार्किक उद्देश्याच्या जागी योजिता येते आणि विधेयाच्या जागी येणारे सर्व शब्द वर्णनपर असतात असे रसेलचे मत आहे. या दृष्टीने 'लाल' हे वर्णन आहे; विशेषनाम नाही.

नाम (विशेषनाम) व वर्णन यांत भेद करताना नाम हे सरलचिन्ह असते व वर्णन हे व्यामिश्रचिन्ह असते असे रसेल म्हणतो. पण याचा अर्थ काय घ्यायचा? व्यामिश्र चिन्ह म्हणजे एकाहून अधिक

अनुक्रमणिका

शब्दचिन्हांचे बनलेले आणि सरलचिन्ह म्हणजे एकच शब्द असलेले असा अर्थ घेतल्यास, पूर्वी म्हटल्याप्रमाणे 'सर वॉल्टर स्कॉट', 'महात्मा गांधी' हे व्यामिश्र म्हणून वर्णने ठरतील आणि 'लाल', 'गोड' इत्यादी सरल चिन्हे म्हणून विशेषनामे ठरतील. परंतु रसेलला हे अभिप्रेत नसावे. सरल चिन्ह म्हणजे ज्याचे विश्लेषण करता येत नाही ते. या अर्थाने 'सर वॉल्टर स्कॉट' या नावात जरी तीन शब्दचिन्हे असली, तरी त्याचे विश्लेषण करता येत नाही; कारण तीन स्वतंत्र अर्थ असलेल्या शब्दचिन्हांपासून ते व्यामिश्र चिन्ह बनलेले नाही. जसे 'जगातील सर्वांत उंच पर्वत' या उलट 'लाल' हा एकच शब्द असला तरी त्याचा अर्थ समजावून घेताना तो ज्या प्रकारच्या विधानात वापरला जातो त्या विधानप्रकाराच्या आकृतिबंधाचा उल्लेख करावा लागतो. उदा., 'क्ष लाल आहे'. लाल या शब्दचिन्हाचे तार्किक स्वरूप समजणे म्हणजे 'क्ष लाल आहे' या आकृतिबंधाचे विधान समजणे. या दृष्टीने 'लाल' याचे विश्लेषण करता येते व म्हणून ते व्यामिश्र चिन्ह आहे, असे म्हणता येईल. नाम समजणे म्हणजे त्या नामाने निर्देश होणाऱ्या नामीशी परिचय होणे व वर्णन समजणे म्हणजे त्याचा विधानात कसा उपयोग होतो, हे समजणे. नाम ज्या प्रकारे स्वतंत्र रीत्या समजू शकते, त्या प्रकारे वर्णन समजू शकत नाही. म्हणून वर्णन 'अपूर्ण चिन्ह' किंवा 'अपूर्ण संज्ञा' आहे. त्याचे स्वरूप वैधानिक फलनासारखे आहे हे मत रसेलने 'तार्किक अणुवादी' भूमिकेतून मांडले आहे.

१९४० साली प्रसिद्ध झालेल्या "अॅन् इन्क्वायरी इन्टू मीनिंग अँड ट्रूथ" या ग्रंथात रसेल 'हे लाल आहे' हे उद्देश्य–विधेय स्वरूपाचे विधान आहे असे मानीत नाही. कारण तसे मानले तर 'हे' या दर्शक सर्वनामाने अज्ञेय द्रव्याचा निर्देश होतो असे मानण्याची आपत्ती येते. म्हणून तो तेथे असे सुचवितो, की 'हे लाल आहे' याचा अर्थ 'येथे लालपणा आहे' (redness is here) असा करून 'लाल' हे विधेय न मानता नाम मानावे आणि मग वस्तू म्हणजे लालपणा, कठीणपणा इत्यादी गुणधर्मांचा संघात मानावा (पृ. ९२). अर्थात डॉ. बखले ' 'लाल' हे विशषनाम आहे असे म्हणतात, तेव्हा त्यांना रसेलच्या या मताचा ऊहापोह करायचा होता असे दिसत नाही. ते रसेलच्या तार्किक अणुवादी भूमिकेचेच विवेचन करीत आहेत.

दैनंदिन भाषिक व्यवहारात विशिष्ट व्यक्तीचा निर्देश आपण तीन प्रकारांनी करतो– (१) विशेषनामाचा उपयोग करून– उदा., गोपाळ, सह्याद्री इत्यादी; (२) दर्शक सर्वनामाच्या साहाय्याने– उदा., हा, तो, इत्यादी; आणि (३) असंदिग्ध वर्णनाच्या साहाय्याने– उदा., 'शाकुंतल नाटकाचा लेखक', 'भारतातील सर्वांत उंच पर्वत' इत्यादी यामुळे– व्याकरणदृष्टचा हे तिन्ही प्रकारचे शब्दप्रयोग उद्देश्याच्या जागी योजले जातात. या साम्यामुळे या तीन प्रकारच्या शब्दांचे किंवा शब्दप्रयोगांचे तार्किक स्वरूप एकच आहे असे मानण्याची चूक केली जाते. परिणामतः तत्त्वज्ञानात काही चुकीचे निष्कर्ष काढले जातात. यासाठी रसेल या तीन प्रकारच्या शब्दप्रयोगांचे तार्किक स्वरूप कसे भिन्न आहे हे दाखवितो. 'हा', 'तो' इत्यादी दर्शक सर्वनामांचे कार्य वस्तूचा केवळ निर्देश करणे एवढेच असते. ती निर्दिष्ट वस्तूचे वर्णन करीत नाहीत. यांना रसेल 'तार्किक विशेषनामे' म्हणतो आणि या प्रकारात 'येथे', 'आता' इत्यादी शब्द घालतो. व्याकरणात ज्याला विशेषनाम म्हणतात त्या शब्दाचे कार्य बहुतांशी वस्तू–निर्देशाचे असते, वर्णनाचे नसते. म्हणून त्याला तार्किक विशेषनामासारखे मानायला हरकत नाही. कारण आपण विशेषनामाचा अर्थ विचारीत नाही तर त्याने कोणाचा निर्देश होतो, असे विचारतो. परंतु काही वेळा विशेषनामांचा उपयोग 'संक्षिप्त वर्णने' म्हणूनही केला जातो. उदा., येशूख्रिस्त ही ऐतिहासिक व्यक्ती होती.' येथे येशूख्रिस्त हे संक्षिप्त वर्णन आहे व हे वर्णन लागू पडणारी एकतरी व्यक्ती होती असा या वाक्याचा अर्थ आहे. संदिग्ध किंवा असंदिग्ध वर्णन एखाद्यावेळी वस्तूचा निर्देश करण्यासाठी उद्देश्य म्हणून वापरण्यात आले, तरी त्याचे तार्किक स्वरूप विशेषनामासारखे मानता येणार नाही, असे रसेलचे मत आहे.

रसेलच्या या मताचे विवेचन डॉ. बखले यांनी पृ. ७० ते ७९ येथे केले आहे. परंतु ते विवेचन पुष्कळ ठिकाणी संदिग्ध झाले आहे. या संदिग्धतेचे








एक कारण म्हणजे उद्देश्य व विधेय ही पदे व्याकरणशास्त्र आणि तर्कशास्त्र अशा दोन अर्थाने वापरता येतात आणि हे दोन उपयोग डॉ. बखले यांच्या विवेचनात पुरेसे अलग व स्वतंत्र ठेवले गेले नाहीत. उदा., पृ. ७३ वर वर्णनाचे स्वरूप सांगताना खालील परस्परविरोधी वाक्ये येतात : 'वर्णनाचा उपयोग विशेष व्यक्तीचा अथवा वस्तूचा निर्देश करण्याकरिता भाषेत पुष्कळदा करण्यात येतो' असे म्हणून लगेच पुढल्या परिच्छेदात 'असा निर्देश वर्णन करीतच नाही' असे म्हटले आहे. त्याच्या पुढे परत 'वर्णनाचा उपयोग विधानात उद्देश्याच्या जागी किंवा विधेयाच्या जागी करण्यात येतो' असे म्हटले आहे. अशा प्रकारचे वर्णनाचे स्वरूप सांगून शेवटी 'वर्णनाने व्यक्तीचा अथवा वस्तूचा निर्देश होऊ शकतो काय?' हा विवाद्य प्रश्न ते उपस्थित करतात आणि पृ. ७४ वर, दैनंदिन भाषेत आपण व्यक्तीचा अथवा वस्तूचा निर्देश करण्यासाठी जरी वास्तविक वर्णनाचा उपयोग करीत असलो, तरी हा गैरसमज असल्याचे रसेलचे मत आहे, असे डॉ. बखले सांगतात. यांतील प्रत्येक वाक्य जरी भिन्न भिन्न संदर्भांत बरोबर असले, तरी हे भिन्न संदर्भ स्पष्ट केले नसल्यामुळे सबंध विवेचन गोंधळात टाकणारे झाले आहे. व्याकरणदृष्टया आपण वर्णनाचा उपयोग कसा करतो, तार्किक दृष्टया आपण वर्णनाच्या स्वरूपाविषयी सामान्यपणे काय मानतो आणि रसेलच्या मते तार्किक दृष्टया वर्णनाचे स्वरूप कसे मानणे बरोबर आहे हे तीन संदर्भ वेगळे करून हे विवेचन होणे आवश्यक होते. परंतु ते तिन्ही संदर्भ एकमेकांत इतके मिसळले आहेत, की ते अलग करणे वाचकाला, आणि विशेषतः सामान्य वाचकाला दुरापास्तच ठरणार आहे.

पुस्तकाची भाषा सोपी व प्रवाही आहे. परंतु 'हे आपण लक्षात ठेवले पाहिजे' अशा प्रकारचे काही शब्दप्रयोग काही प्रमाणात थोडया अधिक प्रमाणात आल्यामुळे खटकतात. तसेच एकाच व्यक्तीचे नाव पृ. १८ वर 'ओकायम' तर पृ. २३ २४ वर 'ओकॅम' असे आले आहे आणि Urmson चा उच्चार 'उर्मसॉन' (पृ. १५३–१५५) केला गेला आहे. या व अशा बाबतीत थोडी अधिक काळजी घ्यायला हवी होती.

कोणतीही कृती परिपूर्ण आहे असे मानणे किंवा दावा करणे चूक ठरेल. या दृष्टीने या पुस्तकातील काही गुणदोषांचे थोडक्यात दिग्दर्शन करण्याचा येथे प्रयत्न केला आहे. रसेलच्या तत्त्वज्ञान-विचाराची तोंडओळख करून देण्याच्या दृष्टीने डॉ. बखले यांचे हे पुस्तक उपयोगी ठरेल. परंतु यातील भाषामीमांसा आणि रसेलची विश्लेषणपद्धती यांविषयीचे लिखाण थोडे अधिक काळजीपूर्वक केले गेले असते, तर ते निश्चितच अधिक उपयुक्त ठरले असते.

**– शि. स. अंतरकर**

○ ○ ○












## वाद–संवाद

संपादक, नवभारत मासिक यांस,

स. न. वि. वि.

ऑगस्टच्या नवभारत मासिकातील माझ्या लेखातील काही भागावर आक्षेप घेणारे श्री. अरुण ठाकूर यांचे पत्र वाचले. मुळशी सत्याग्रहात प्रमुख भाग घेणाऱ्यांपैकी काही जणांशी माझा व्यक्तिशः संबंध आला होता. त्यांचे कार्य व स्वार्थ-त्याग याबद्दल मला नितांत आदर आहे.

पं. मालवीयजी सनातनी वातावरणात वाढले, त्यांचे व्यक्तिगत आचरण पण एखाद्या सनातन कर्मठ हिंदूप्रमाणेच होते. असे असता देशाला भविष्यात विज्ञान व तंत्रविद्या या दोहोंची अत्यंत आवश्यकता लागणार आहे, याचे स्पष्ट चित्र त्यांच्या अंतःचक्षूसमोर साकार झाले होते याविषयी कोणासही कुतूहलजनक आश्चर्य वाटेल. तत्कालीन लोकांची विचारसरणी (अथवा प्रतिसाद) याचे एक उदाहरण म्हणून मुळशी सत्याग्रहाचा उल्लेख केला होता. सत्याग्रहाच्या इष्टानिष्टतेविषयी त्यामध्ये काहीही टिप्पणी करावयाचा उद्देश नव्हता व तसे करण्याची आवश्यकता पण नव्हती. कोणत्याही कारणामुळे जर तेथील विद्युत प्रकल्प स्थगित झाला असता (उदा., समजा जर टाटा कंपनीने लोकांनी पुढे केलेल्या अटींवर प्रकल्पच करावयाचा नाही असा निर्णय घेतला असता), तर त्यामुळे काय परिस्थिती निर्माण झाली असती, हा विचार पुढे मांडावयाचा होता. टाटांच्या व्यतिरिक्त वरील प्रकल्प संपन्न करावयाच्या काही योजना कोणी पुढे केल्याचे मला माहीत नाही.

सध्याच्या काळात या प्रश्नाला विशेष महत्त्व आहे. परिस्थिती अनुकूल न वाटल्यामुळे देशाच्या एका विभागातील उद्योगधंदे दुसऱ्या विभागात स्थानांतरण करण्याची प्रवृत्ती आज दिसते. याच कारणाकरिता उद्योगधंदे एका देशामधून दुसऱ्या देशात स्थानांतरण करू लागले, तर या घटनेमुळे त्या देशाचे किंवा तेथील स्थानिक लोकांचे भले होणार आहे की वाईट या प्रश्नाचे उत्तर शोधून काढण्याची वेळ आली आहे. या संदर्भात मला Ayn Rand या लेखिकेच्या When Atlas Shrugged या कादंबरीमध्ये वर्णन केलेल्या अशाच एका प्रसंगाची आठवण होते. या प्रसंगात तंत्रज्ञ व कारखानदार यांनी राजकीय व सामाजिक शक्तींनी त्यांवर घातलेल्या विविध निर्बंधांमुळे कंटाळून जाऊन, त्यांच्याशी असहकार करावयाचे ठरविले तर समाजामध्ये काय परिस्थिती होईल, याचे तेथे चांगले दिग्दर्शन केले आहे.

श्री. सहस्रबुद्धे यांचे या प्रश्नाविषयी जे विचार उद्धृत केले आहेत ते मूलभूत आहेत, आकर्षक आहेत. त्यांविरुद्ध कोणीही आक्षेप घेऊ शकणार नाही. त्यांनी फक्त मानव-संबंधित निर्माण होणाऱ्या समस्येचा विचार केला आहे. कोणताही प्रकल्प सिद्ध करावयाचा म्हटला तर त्यामध्ये इतर अनेक तऱ्हेच्या समस्या पण निर्माण होताना दिसतात, ज्यांकरिता ठाम उत्तरे मिळविणे तितकेच अवघड असते. सध्याच्या यंत्रयुगात मानव आर्थिक व्यवस्थेचा दास बनला आहे, समाजातील संपत्तीवाटपात भयंकर विषमता आहे. त्यामुळे नीतिमूल्ये व धर्म यांकडे दुर्लक्ष होत आहे. एवढेच काय, पण त्यामुळे परिसर वातावरणात प्रदूषण निर्माण होत आहे. वाढत्या लोकसंख्येला अन्नधान्य व जीवनोपयोगी वस्तू निर्माण करण्याकरिता यंत्रांची व कारखान्यांची जरुरी आहे. देशाचे संरक्षण करण्याकरिता पण भारी अवजड उद्योगधंद्यांची जरुरी आहे. आणि या सर्व योजना त्वरित अमलात आणण्याची निकड आहे, असा अर्थतज्ज्ञांचा दावा आहे. आपणास योग्य व स्वीकारार्ह वाटणाऱ्या अशा सर्व अटींसह यंत्रसाहाय्य मिळण्याची शक्यता असती, तर हा प्रश्न सोपा झाला असता. यांपैकी काही अटी पूर्ण न करताच जर यंत्र-योजना साध्य करणे शक्य होणार असेल, तर त्याचा स्वीकार करावयाचा की नाही, या मूलभूत प्रश्नाकरिता उत्तर मिळविणे कठीण दिसते.

मनुष्यातील चांगल्या प्रवृत्ती, आदर्शवाद व त्याचा ज्यांवर विश्वास आहे अशी नीतिमूल्ये इत्यादींच्या योगे मानवी उद्दिष्टे निश्चित करता येतात. पण ती अमलात आणावयाचा प्रश्न निर्माण होतो त्या वेळी विज्ञान, तंत्रविद्या व आर्थिक निर्बंध








यांचे मार्गदर्शन स्वीकारण्याशिवाय दुसरा मार्ग राहत नाही, असे कळते. या सर्व गोष्टींचा विचार करून वर निर्देशित केलेल्या किंवा अन्य समस्या ज्यामध्ये उद्भवणार नाहीत, असा मार्ग जर कोणी शोधून काढला व त्याचे प्रात्यक्षिक करून दाखविले, तर यासारखी संतोषजनक दुसरी कोणतीही गोष्ट असणार नाही. विज्ञान व तंत्रविद्या यांकडे काही कारणामुळे दुर्लक्ष केले, तर काय होते याचे स्पष्ट दिग्दर्शन भारताचा गेल्या हजार-दीडहजार वर्षांचा इतिहास करतो. जे देश आपल्या गत-इतिहासापासून धडा शिकत नाहीत, त्यांवर तो इतिहास परत जगण्याची पाळी येते. या गोष्टीची तीव्र व स्पष्ट जाणीव तथाकथित सनातनी प. मालवीयजींच्या कार्यात जेवढी दिसून येते, तितक्या प्रमाणात हिचे दर्शन त्या काळी अन्यत्र कोठेही घडत नव्हते, एवढेच मला म्हणावयाचे होते.

– व. त्रिं. चिपळोणकर

संपादक ' नवभारत ' मासिक यांस

स. न. वि. वि.

' नवभारत ' जुलैच्या अंकात श्री. भुजंग मेश्रामांचा ' गोंडी गोत्रनामे आणि त्यांचे सांस्कृतिक संदर्भ ' हा अनुभवसिद्ध असा लेख वाचावयास मिळाला. विविध मुद्द्यांच्या विस्कळित जुळवणीचा एक दोष जर सोडला, तर या लेखातील एकंदरीत सामग्री अत्यंत नावीन्यपूर्ण आणि संशोधनात्मक स्वरूपाची वाटली. त्याबद्दल श्री. भुजंग मेश्राम धन्यवादास पात्र आहेत व ' नवभारत ' अभिनंदनास पात्र आहे.

ऑगस्ट ८३ च्या 'नवभारता'तील पत्रव्यवहारात श्री. सुधांशु गोरे यांचा त्या लेखावरील आक्षेप घेणारा लेखही वाचनात आला. त्यांच्या आक्षेपांतील अवास्तवता दर्शविण्याच्या हेतूने काही मुद्दे पुन्हा उपस्थित करण्याचा येथे प्रपंच केला आहे.

काही वर्षांपूर्वी चंद्रपूर जिल्ह्यातील माडीया गोंडांत वावरणाऱ्या श्री. गोरे यांना श्री. भुजंग मेश्रामांच्या सदरहू लेखातील अनेक गोंडी शब्द किंवा गोंडी नामसंदर्भातील अर्थांमध्ये कोणती आणि कितपत विपर्यस्तता आढळून आली, याचा त्यांनी कुठेच उल्लेख केला नाही. अनेक शब्द जाऊ द्या, पण एकसुद्धा गोंडी शब्द चुकीच्या अर्थाने वापरला गेला आहे हे श्री. गोरेंना दाखविता आले नाही. पण लेखात केवळ चुकाच असल्याचे त्यांनी वारंवार लिहिलेले आहे. अशा चुकीच्या आग्रहामुळे श्री. गोरेना गोंडी भाषेची साधी बाराखडीही माहीती नाही, असे वाटते. भाषाशास्त्रदृष्ट्या सदरहू लेख चुकीचा म्हणून सिद्ध करण्यासाठी त्यांनी जे काही मुद्दे पुढे मांडले, तेही निव्वळ विसंगत असेच आहेत.

पहिल्या मुद्द्यात श्री. गोरेंनी ग्रीयर्सन, स्टीफन फुक्स, रसेल, हिरालाल, डॉ. इरावती कर्वे यांची नावे (आपल्या पदरची) घालून त्यांचे संशोधन वरपांगी असल्याचा दावा भुजंग मेश्रामांच्या तोंडी घालण्याचा अकारण प्रयत्न केला. मूलतः भुजंग मेश्रामांच्या लेखात ह्या संशोधनकार्याचा व संशोधकांचा मुळीच उल्लेख आलेला नाही. त्यांनी केवळ ' गोंडी गोत्रनामे व त्यांचे सांस्कृतिक संदर्भ शोधण्याच्या कामात जेवढे पुस्तकी साहित्य उपलब्ध आहे, तेवढे मात्र तोकडे पडेल, ' असा आशय व्यक्त केलेला आहे. आणि त्यांचा तो आशय तंतोतंत बरोबरही आहे. जर भुजंग मेश्रामांचे विधान खोटे म्हणून सिद्ध करावयाचे आहे, तर श्री. गोरे यांनी गोंडीयनांच्या ७५० गोत्रनामांचे अर्थ आणि त्यांतील गहन सांस्कृतिक संदर्भांचे विश्लेषण कोणत्या लेखकाने कोणत्या पुस्तकात करून ठेवलेले आहे हे प्रथम दाखवून द्यायला पाहिजे होते. पण श्री. गोरे हे दाखवू शकत नाहीत, ही वस्तुस्थिती आहे. आणि जर पूर्वसूरींनी या संदर्भात लिहिलेच नाही, तर त्यांच्या लिखाणातील चुका काढण्याचा प्रश्नच कुठे उद्भवतो ? म्हणूनच श्री. मेश्रामांनी पूर्वसूरींनी चुकीचे लिहिले असे म्हटले नाही, तर या संदर्भात त्यांचे लिखाण तोकडे आहे असे म्हटले आहे. दुसऱ्या मुद्द्यात श्री. सुधांशु गोरे यांनी आपल्या अज्ञानाचेच प्रदर्शन आपल्या प्रतिक्रियेत केले आहे. ते म्हणतात, 'गोंडांच्या कुल गोत्रे, देवसंख्या आदींच्या बाबतीत देशकालपरत्वे मोठ्या प्रमाणात भिन्नता आढळून येते. ' हा ढोबळ आणि अंदाजे शेरा त्यांनी मारला आहे. श्री. गोरे एखाद्या प्रदेशातील गोंड लोकांमध्ये ४ सगां (गोत्र संच वा ' क्लान सेक्ट ') ऐवजी कमी किंवा जास्त संख्येत अस्तित्वात असल्याचे सिद्ध करू शकतात काय ? ख्रिस्टोफ बॅरन हैमनडॉर्फ, सेतुमाधवराव

पगडी, एल्वीन, रसेल किंवा कोणताही गोंड माणूससुद्धा श्री. मेश्रामांच्या प्रतिपादनाच्या विरुद्ध जाऊ शकत नाही; मग श्री. गोरेंनाच येथे प्रदेशभिन्नता कशी आढळते हा मोठाच प्रश्न पडतो. मडावी हा दिल्लीतील असो की लंकेतील असो, जंगलातील असो की शहरातील असो, तो ७ देवेच राहील. मसराम हा कोणत्याही प्रदेशात असो तो ७ देवेच राहील; धुर्वे हा कोठेही असो तो ७ देवेच राहील. एखाद्या ठिकाणी श्री. गोरेंना एक देवे किंवा २ देवे, असा तो आढळला आहे काय ? आढळला असल्यास त्यांनी त्वरित कळवावे, की अमुक ठिकाणचे धुर्वे २ देवे आहेत आणि तमुक प्रदेशात केवळ ४ देवे भलावी राहतात. सद्यस्थितीत प्रचलित असलेले समाजशास्त्र किंवा मानववंशशास्त्र यामध्ये गोंडांची ही देवेप्रकरणे, गोत्रप्रकरणे किंवा गोत्रसंचप्रकरणे अजून नमूद झालीच नाहीत आणि म्हणून त्यांविषयीचे ज्ञान श्री. सुधांशु गोरे प्रभृतीना ती शास्त्रे शिकून प्राप्तही होऊ शकत नाही. त्यासाठी भुजंग मेश्रामांचे असेच स्फुट स्वरूपात किरकोळ वाटणारे प्रसिद्ध झालेले लेख जोपासावे लागतील आणि त्यांतूनच ही शास्त्रेही हळूहळू पूर्णत्वास येतील. आज ती शास्त्रेच तोकडी आहेत, हे श्री. गोरे यांनी प्रथम लक्षात घेणे आवश्यक आहे.

तिसऱ्या मुद्द्यात श्री. गोरेंनी गोंडांचा नाग लोकांशी संबंध दाखविणे निरर्थक असल्याचे सांगितले आहे. जेव्हा भुजंग मेश्राम कोटनाक, जुन्नाक, कन्नाक आदी गोंडांची नागयुक्त गोत्रनामे दर्शवून तिचा संबंध नागसंस्कृतीशी निगडित करण्याचा प्रयत्न करतात; तसेच बिबीनगा, हिंजीनगा, राजनेगी, गंगनेगी आदी ' नगा ' आणि ' नेगी'युक्त गोंडांची गोत्रनामे निर्देशित करून नाग संस्कृतीशी तिची अधिक जवळीक दर्शवितात, तेव्हा भुजंग मेश्रामांचे प्रतिपादन अधिकाधिक सबळ होत जाते. गोंडांचे आद्य दैवत संबूरसेख हे शुद्ध नागदेवतेच्या स्वरूपातच पूजिले जाते. चंदनशेख हे त्याचे दुसरे रूप होय आणि ते नाग संस्कृतीतही तसेच पूजिले जाते. ह्याही बाबी भुजंग मेश्रामांच्या प्रतिपादनास पुष्टीच देतात. मग मेश्रामांची माहिती वरपांगी कशी ?

गोंडांचा महें-जो-दारोशी कसा संबंध पोचतो हे गोंडी गोत्रनामांच्या संदर्भात तर पडताळता येतेच; पण त्याशिवाय फादर हेरास यांच्यासारख्या तज्ज्ञानेसुद्धा ते सिद्ध केलेले आहे. त्यामुळे श्री. गोरेंना आश्चर्य वाटायला नको.

चौथ्या मुद्द्यात श्री. गोरेंनी 'तूप ' शब्दाबाबतचा उल्लेख केला. मूळ लेखातही मेश्रामांनी हा मुद्दा नीट मांडला नाही. त्याची मांडणी अशी हवी होती :

" गोंड लोकांत ' पालोती ' हे एक गोत्रनाम आहे. पालोती हा शब्द ' पालोनी ' या गोंडी शब्दापासून तयार झाला आहे. त्यात पाल + नीई असे दूध + तेल अशा अर्थाचे शब्द आहेत. पालोनी शब्दसुद्धा ' दुधाचे तेल ' अशा अर्थाचाच आहे व त्याला मराठीतील पर्यायी शब्द ' लोणी ' हा आहे. येथे लोणी हा शब्द गोंडीतून मराठीत आलेला आहे, हेही सिद्ध होते आणि पालोती या गोत्रनामाचा संदर्भ ' क्षीरसागर ' अशा अर्थाने ' दुधाने न्हाऊन निघणारा ' असा 'ऋग्वेदा 'तील पहिल्या मंडलातील १०४ व्या सूक्तामध्ये दर्शविल्याप्रमाणे गोंड राजाच्या राण्या त्याला दुधाने आंघोळ घालतात (क्षीरेण स्नतः कुयवस्य योषे ।।), याच्याशी जुळतो." असा हा विस्तार भुजंग मेश्राम यांनी आपल्या लेखात केला नाही, ही बाब खरी आहे; पण तरीसुद्धा त्या लेखात विपर्यस्तता आहे असे म्हणणे योग्य नाही.

चौथ्या मुद्द्यामध्ये श्री. गोरेंनी 'सर्वच गोत्रनामे बदलत असतात ' हे सिद्ध करण्याकरिता डॉ. भाऊ मांडवकरांचे एक विधान श्री. भुजंग मेश्रामांच्या तोंडी घालून दिले. वास्तविक पाहता गोंड लोकांत पेंडाम हे पिंडम्शी सांस्कृतिक संदर्भ जोडणारे गोत्रनाम ६ देवे गोंडीयनांचे आहे व पंधराम हे धवल स्फटिक किंवा ' हिरा' या अर्थाचे ' स्फटिकमय हो ' असा आदेश देणारे ७ देवे गोंडीयनांचे भिन्न गोत्रनाम आहे. ते प्राचीन काळापासून जसेच्या तसे आताही आहे; पेंडामचे ते उत्तररूप नव्हे. त्यामुळे गोत्रनामांचे स्वरूप बदलत जाते असे म्हणता येत नाही. धुर्वे आणि दुर्वे या उच्चारणपद्धतीतील फरकामुळे दोन्ही स्वरूपातील एकच गोत्र अस्तित्वात आहे; पण ती दोन भिन्न गोत्रे आहेत असे कोणीच समजत नाही. ते एकच गोत्र होय. दुर्वे आणि धुर्वे हे एकाच गोत्रासाठी संबोधिलेले दोन शब्द होत. इंग्रज लोक त्यालाच डुर्वे किंवा ढुर्वे अशाही स्वरूपात संबोधू शकतात. पण गोत्र ते एकच असते. ७ देवे म्हणजे एष्ठवेनसुरा ( एरवेन ) असते. ते ६ देवे मात्र कधीच असू

अनुक्रमणिका

शकत नाही. यातील गुह्य श्री. सुधांशु गोरेंना कळूच शकत नाही. कारण त्यांचे या संदर्भातील ज्ञान अनुभवजन्य नसून पुस्तकी आहे.

पाचव्या मुद्द्यात त्यांनी आत्राम गोत्राबाबतच्या प्राचीनतेबाबत संशय व्यक्त केला आहे. आत्राम हे गोत्रनाम गोंड, परधान, ओझी, कोयतूर पाटाळी, ढोली, बुरड, थोटी, सरोती, पाळा, पणळा, कोलाम आदी कितीतरी गोंड समूहांतील उपजमातींमध्ये अत्यंत प्राचीनतम असल्याचे आढळून येते. एवढेच नव्हे, तर प्रत्येक प्रदेशात प्रत्येक उपजातीत ते नाम ६ देवे गोत्रसंघातच मोडते. प्रत्येक ठिकाणी त्याचा अर्थ 'सोन्यासारखा हो' असाच आढळतो. म्हणूनच सोने धातूचा शोध लागल्यानंतर आत्राम गोंड निपजले, असा त्याचा अर्थ घेणे सयुक्तिक नाही; तर सोने धातूच्या अलीकडे लागलेल्या शोधापूर्वी किती तरी हजारो वर्षांपूर्वीच गोंड लोकांनी सोने धातूचा शोध लावला होता आणि आपली संस्कृती वैभवसंपन्न केली होती. परंतु त्यांची वैभवसंपन्नता परकीयांच्या आक्रमणामुळे नष्ट झाली आणि ते जीव घेऊन डोंगरदऱ्यांतून राहायला गेले. त्यानंतर कित्येक वर्षेपर्यंत सोन्याचा वापर अन्य लोकांना करता आला नाही. आणि जेव्हा पुन्हा सोने शोधले गेले, ते दुसऱ्यांदा होय. गोंडलोक 'सोन पाखरू'ला 'आतर वीशी' असे म्हणतात. या शब्दात आतर म्हणजे सोने असाच अर्थ आहे. व तो अतिप्राचीन शब्द होय.

गोंडलोक समुद्रापलीकडून आले, असेही समजण्याचे कारण नाही; कारण फार प्राचीन काळी दक्षिण अमेरिका, दक्षिण आफ्रिका, दक्षिण अंटार्क्टिका, ऑस्ट्रेलिया आणि भारत हा प्रचंड भूभाग (दक्षिण भू-गोलार्ध) एकत्र होता व त्यास 'गोंडवाना लँड' नावाने संबोधले जात असे ( इयत्ता ८ वी चा भूगोल, पृष्ठ २२ पाहावे ) हा सिद्धांत प्रथमतः ऑस्ट्रेलियाचे भूगर्भशास्त्रज्ञ डॉ. एडवर्ड स्वेस यांनी मांडला. त्यास रशियाचे मुरँटोव्ह, अग्रेनंट, मुंझाबीट आदी शास्त्रज्ञांनी दुजोरा दिला. दक्षिण भू-गोलार्धात गोंडांचेच राज्य होते, याला गोंडी भाषेतील अनेक शब्दांचे आंतरराष्ट्रीय भाषांतील शब्दांशी असलेले साम्य पाहिल्यावर पुष्टी मिळते. जसे गोंडातील टेकाम या गोत्राचा सांस्कृतिक संदर्भ Teek wood शी आहे. त्याचा अर्थ 'सागासारखा हो.' "कोकोडे" या ७ देवे गोत्रनामाचा Cock + उडे म्हणजे 'कोंबड भरारी घेणारा' शी संदर्भ जुळतो. गोंडराजा रावण तर जागतिक कीर्तीचा होता, असा गोंडांचा समज आहे. इजिप्शियन 'रा' शब्द सूर्य-प्रकाश, संस्कृत रवि म्हणजे सूर्य आणि रावण म्हणजे 'रामायणा' तील 'आदित्यां वर्णाभ्यां कुंडलेभ्यां विभूषितः' असा हा गोंडाचा 'रावूड' म्हणजेच रावण हा सूर्य शब्दाशी एकरूप पावतो. गोंडी भाषेतील 'आजचा दिवस' या अर्थाचा 'नेंडे' हा इंग्रजीतील day शी एकरूप होतो. गोंडांच्या गोत्रनामांतील अर्थसंदर्भात व्यापकता पाहण्यासाठी ओरिसातील कोरापूर ( जिल्हा ) याच्याशी नामसादृशता असणारे गोत्रनाम 'कोरपटे' किंवा 'कोरपाते', किंवा आंध्रमधील काकिनाडशी नामसादृश्य 'कोकाडघाळ' किंवा ओरिसातील गंजाम भूप्रदेशाशी नामसादृश असणारे 'गंजाम'; तारीम नदीशी नामसादृश्य असणारे ताराम; लक्षद्वीपाजवळील कवरत्ती द्वीपाशी नामसादृश्य असणारे कवरती गोत्रज आणि सयाम देशाची निर्देशक गोंडातील सयाम गोत्रनामे ही बोलकी व पुरेशी आहेत. गोंडीयनांची सांस्कृतिक व्यापकता व गोत्रनामांतील अर्थगर्भता शोधण्याकरिता ही नावे अत्यंत चालना देणारी ठरतात आणि श्री. भुजंग मेश्रामांच्या लेखात हे निर्देश मिळतात. मेश्रामांच्या लेखात गंभीर चुका दर्शविण्याचा आव आणूनही श्री. गोरे यांना एकही चूक दाखविता आली नाही किंवा त्याचा त्यापेक्षा वेगळाच अर्थ असल्याचेही ते दाखवू शकले नाहीत.

मसराम म्हणजे 'नाकासारखे हो', पोयाम म्हणजे 'सुगंध दरवळल्याप्रमाणे हो' आदींपेक्षा वेगळे अर्थ प्रचलित आहेत, असेही श्री. गोरे सिद्ध करू शकले नाहीत आणि तरीही सदरहू अर्थ ग्राह्य मानण्यास ते तयार नाहीत. श्री. गोरे यांच्या प्रतिपादनात शास्त्रीयता असण्याचा आग्रह शब्दाशब्दांतून दिसून येतो; पण गोंडी भाषेतील आणि गोंडी संस्कृतीतील संदर्भांची श्री. गोरे यांना तोंडओळखही नाही, हेच त्यांच्या प्रतिक्रियेतून प्रकर्षाने जाणवते.

— व्यंकटेश आत्राम

० ० ०












# सार-संकलन

## पाकिस्तानची एकता

ऑगस्ट १४ हा पाकिस्तानचा स्वातंत्र्यदिन आहे. ह्या वर्षीच्या सदतिसाव्या स्वातंत्र्यदिनी पाकिस्तानमध्ये आठ विरोधी पक्षांनी लोकशाहीच्या पुनःस्थापनेसाठी आंदोलन सुरू केले. ह्याला निमित्त झालेली चिथावणी म्हणजे जनरल झिया उल् हक यांनी ऑगस्ट १२ रोजी राष्ट्राला उद्देशून केलेले भाषण. त्यात त्यांनी मार्च १९८५ पर्यंत सार्वत्रिक निवडणुका होऊन लष्करी कायदा उठविण्यात येईल अशी जरी घोषणा केली, तरी आपण राष्ट्राध्यक्ष म्हणून नंतरही राहू आणि पंतप्रधानांसोबत सत्तेत भागीदार असू असेही जाहीर केले. या आठ विरोधी पक्षांतील एक घटक पक्ष हा राष्ट्रीय लोकशाही पक्ष असून खान अब्दुल गफारखान यांचे चिरंजीव खान अब्दुल वलीखान हे त्याचे एक प्रमुख पुढारी आहेत.

वलीखान यांनी सतत पख्तूनिस्तानचा पुरस्कार केलेला असल्यामुळे पाकिस्तानी राज्यकर्ते त्यांच्यावर नेहमीच नाराज होते. आपल्या ६६ वर्षांच्या आयुष्यातील १४ वर्षे त्यांनी तुरुंगात काढली आहेत; ३ वर्षे 'छोडो भारत' चळवळीत आणि उरलेली स्वतंत्र पाकिस्तानमध्ये. पाकिस्तान अस्तित्वात आल्याबरोबर त्यांची सहा वर्षे तुरुंगात रवानगी करण्यात आली होती. अयूबखान यांच्या राजवटीत त्यांना एका वर्षाची कैद झाली होती. भुट्टो यांनी तर त्यांना १४ वर्षांची शिक्षा सुनावली होती. याबरोबरच त्यांना अनेक प्रलोभने पण दाखविण्यात आली होती. उदा., प्रांताचे मुख्यमंत्रिपद किंवा केंद्रात मंत्रिपद. पण वलीखान हे मूलतः पठाण आहेत. त्यांचा झगडा पठाणांच्या स्वायत्ततेच्या हक्कासाठी आहे.

त्यांच्या म्हणण्याप्रमाणे पख्तूनांचे ( पठाणांचे ) भौगोलिक स्थानच असे आहे, की आंतरराष्ट्रीय राजकारणाच्या भोवऱ्यात ही लहान जमात नेहमी खेचली जाते. आज अफगाणिस्तानात पाय रोवून बसलेला रशिया आणि पाकिस्तानातील तळांचा वापर करून त्याला आळा घालू पाहणारी अमेरिका यांच्या संभाव्य टकरीमध्ये पख्तून सापडले आहेत.

वलीखान यांचे निदान असे, की आज पाकिस्तानमध्ये जे आंदोलन सुरू झाले आहे त्याच्यामधून पाकिस्तान आहे त्या स्वरूपात सुखरूपपणे बाहेर पडू शकणार नाही. पाकिस्तान टिकून राहायचे असेल, तर जे चार लोकसमूह त्याचे प्रमुख घटक आहेत– पंजाबी, सिंधी, पख्तून आणि बलुची– त्यांना संपूर्ण स्वायत्तता दिली पाहिजे, आणि समान दर्जा दिला पाहिजे. केंद्राने संरक्षण, दळणवळण, परराष्ट्रीय संबंध, इ. खाती अर्थात सांभाळावी. असे घडले नाही, तर यादवी होऊन पाकिस्तान परत फुटणे अपरिहार्य आहे.

भुट्टो हेसुद्धा हुकूमशहा होते, असे वलीखान यांचे म्हणणे आहे. भुट्टो यांना आपली सत्ता टिकवायची होती आणि म्हणून त्यांचे पंजाबी मालक त्यांना जे करायला सांगत ते करणे त्यांना भाग होते. हे पंजाबी मालक म्हणजे प्रामुख्याने लष्कर. त्याच्यात पंजाब्यांचा वरचष्मा आहे.

वलीखान यांच्या म्हणण्याप्रमाणे झिया आज सहा वर्षे सत्तेवर आहेत आणि पुढील दोन वर्षभरात ते निवडणूक घेऊन नागरी सरकार स्थापन करणार आहेत. त्यांनी सत्ता हातात घेतली तेव्हा तीन महिन्यांच्या आत निवडणुका घेऊ असे आश्वासन त्यांनी दिले होते. निवडलेल्या लोकशाही सरकारलासुद्धा पाच वर्षांपेक्षा जास्त काळ सत्तेवर राहता येत नाही. झियांच्या या आठ वर्षांच्या सत्तेचा ताळेबंद काय आहे? लष्कर कधी सत्ता सोडून देईल असा लोकांचा विश्वासच राहिलेला नाही. आता जिवावर उदार होऊन लोक चळवळीत उतरले आहेत.

सरहद्द प्रांतात शेकडो लोकांनी स्वतःची धरपकड करवून घेतली आहे. सिंधी लोक शांतताप्रिय आहेत; पण तेसुद्धा उठले आहेत. जर पंजाबी लोकांनी




अनुक्रमणिका





त्यांना साथ दिली नाही, तर त्यांच्यामधील फुटीर प्रवृत्ती बळावेल. पाकिस्तान केवळ पंजाबपुरते अवशिष्ट राहील. सर्व बाजूंनी अन्य देशांनी वेढलेले असे ते पाकिस्तान असेल.

ह्या आंदोलनाला झियांची जी प्रतिक्रिया झाली, तिच्या तीन पायऱ्या होत्या असे म्हणता येईल. प्रारंभी त्यांनी चळवळीच्या लोकांना तुरुंगात धाडले. पण त्यांना फटक्यांची शिक्षा दिली. आता त्यांच्यावर गोळ्या झाडण्यात येत आहेत. पण हळूहळू गोळ्यांनीही काम भागत नाही असे त्यांना आढळून येईल.

अमेरिकेकडून लाभणारी अर्धी शस्त्रे पाकिस्तानी लष्कराला मिळतात. आणि अर्धी झिया यांना अनुकूल असलेल्या जमाते इस्लामी या संघटनेला मिळतात. जमातने लोकांविरुद्ध या शस्त्रांचा वापर केला तर लोक खवळून उठतील आणि यादवी युद्धाची सुरवात होईल. कारण इतर लोकही स्वतःच्या संरक्षणासाठी मिळतील तेथून शस्त्रे जमवीत आहेत.

अफगाणिस्तानचा प्रश्न हा त्या देशाच्या लोकांचा आहे. एक तर अफगाणिस्तानने रशियाला आत बोलाविले हे विसरता कामा नये. शिवाय झिया यांचे अफगाणिस्तानविषयी म्हणणे काय आहे ? अफगाण लोकांना स्वतंत्रपणे स्वतःचे सरकार निवडण्याची मोकळीक काबूल राजवट देईपर्यंत आपण स्वस्थ राहणार नाही असे झिया यांनी जाहीर केले आहे. पण ही मोकळीक झिया पाकिस्तानच्या लोकांना स्वतः देतात का ? ह्या परिस्थितीत अफगाणांचा झिया यांच्यावर कसा विश्वास राहील ? गनिमांचा पाठलाग करण्याच्या धामधुमीत ( हॉट पर्सूट ) सरहद्द ओलांडून लगतच्या देशात घुसण्याची प्रथा आता मान्य झाली आहे. याच्या पलीकडे काबूल राजवट पाकिस्तानच्या संदर्भात अधिक काही करीत नाही.

झिया म्हणतात, की अफगाणिस्तान हा त्यांच्या लगतचा देश असल्यामुळे तेथे काय घडते आहे याची चिंता त्यांना स्वाभाविकपणे असते; पण इंदिरा गांधी यांनी पाकिस्तानमधील घडामोडींविषयी चिंता व्यक्त केली, की हा पाकिस्तानच्या अंतर्गत कारभारातील हस्तक्षेप आहे अशी ओरड ते करतात.

पख्तूनांची अवस्था ब्रिटिशांच्या काळात होती त्याहूनही अधिक वाईट झाली आहे. एक तर पाकिस्तानच्या स्थापनेनंतर सर्व शासकीय अधिकारी, व्यापारी वर्ग इ. हे भारतातून तेथे आले. नंतर बहुसंख्य असलेल्या पंजाबी लोकांनी सत्ता हातात घेतली आणि ती स्वाधीन ठेवण्याचा त्यांचा प्रयत्न आहे. लहान प्रांतांना जर सत्तेत खरी भागीदारी देण्यात आली नाही, तर पाकिस्तान टिकून राहणे कठीण ठरेल. पख्तूनांची परिस्थिती तर अधिकच बिकट आहे. "आम्हाला एका प्रांतातून दुसऱ्या प्रांतात प्रवास करण्यासाठी परवाना लागतो. मला इंग्लंडमध्ये राहण्यासाठी व्हिसा मिळविण्यासाठी कराची येथील न्यायालयासमोर उभे राहावे लागले. पाकिस्तान हा आमच्या दृष्टीने एक भिन्न देश आहे.

"पख्तूनिस्तानची मागणी ही जुनी मागणी आहे. ब्रिटिश जाण्यापूर्वी आम्ही स्वतंत्र पख्तूनिस्तानची मागणी केली होती; ती माउन्टबॅटन यांनी नाकारली. नंतर पाकिस्तानमध्ये पख्तूनांनी सामील व्हावे, की नाही हे ठरविण्यासाठी जनमत (रेफरेन्डम) घेण्यात आले. आम्ही त्याच्यावर बहिष्कार घातला; पण आम्ही पाकिस्तानात सामील होण्याचे ठरविले असा त्याचा अर्थ लावण्यात आला. अर्थात आम्ही आमची मागणी सोडून दिलेली नाही. "

सरदार अताउल्ला मेंगल हे बलुची लोकांचे पुढारी आहेत. ते सध्या वलीखान यांच्या प्रमाणेच इंग्लंडमध्ये निर्वासित होऊन राहत आहेत. अलीकडे लंडन येथे झालेल्या एका झिया-विरोधी सभेत त्यांनी सार्वभौम आणि पाकिस्तानपासून स्वतंत्र असे बलुचिस्तान प्रस्थापित करण्याचा बलुची लोकांचा निर्धार आहे असे जेव्हा जाहीर केले, तेव्हा सभेत सहभागी झालेल्या अनेक पाकिस्तानी पुढाऱ्यांनी सभेतून काढता पाय घेतला. पण सरदार मेंगल यांचा आपल्या धोरणावर आणि ध्येयावर दृढ विश्वास आहे. बलुची आणि सिंधी लोकांनी एकी केली पाहिजे आणि पाकिस्तानवर वरचष्मा गाजविणाऱ्या पंजाब्यांच्या तावडीमधून स्वतःची सुटका करून घेतली पाहिजे, अशी मेंगल यांची ठाम भूमिका आहे.










आपण पंजाबी जनतेविरुद्ध नाही. पण पाकिस्तानची पंजाबी फौज आणि पंजाबचे सत्तापिपासू पुढारी यांच्याविषयी आपल्या मनात तीव्र तिरस्कार आहे असे त्यांचे म्हणणे आहे. पंजाब्यांनी सिंधी आणि बलुची लोकांना तिसऱ्या दर्जाच्या नागरिकांसारखे वागविले आहे आणि सिंध व बलुचीस्तान आपल्या वसाहती असल्यासारखे त्यांच्याकडे पाहिले आहे, अशी त्यांची तक्रार आहे. "सैन्यात आणि उच्च श्रेणीच्या सरकारी नोकऱ्यांत सिंधी व बलुची लोकांना प्रवेश नाही. सर्व उद्योगधंदे आणि व्यापार हे पंजाबी लोकांच्या हातांत आहेत. पंजाबी पाकिस्तानात आम्ही का राहावे ? पंजाब्यांनी पंजाबात सुखाने राहावे आणि त्याला पाहिजे तर पाकिस्तान म्हणावे" असे त्यांचे म्हणणे आहे.

१९७७ पासून सरदार मेंगल इंग्लंडमध्ये राहत आहेत. अयूबखानांनी त्यांना तुरुंगात टाकले होते, भुट्टो ह्यांनीही तुरुंगात टाकले होते आणि आपण आता पाकिस्तानात गेलो तर झियाही तेच करणार ह्याविषयी त्यांची खात्री आहे.

बलुचिस्तानात मेंगल, बुग्ती, बेंझन आणि मारी अशा चार टोळ्या आहेत. सरदार अताउल्ला मेंगल यांना त्यांच्या वडिलांचा १९७० मध्ये मृत्यू झाल्यानंतर मेंगल टोळीच्या सदस्यांनी मेंगल टोळीचा प्रमुख म्हणून निवडले. त्यानंतर ते अनेक पदांवर होते. काही काळ ते बलुचीस्तानचे मुख्यमंत्रीही होते.

"बलुची लोक पाकिस्तानविरुद्ध आतापर्यंत दोनदा लढले आहेत. दोन्ही वेळा आम्ही आमच्या जुन्यापुराण्या शस्त्रांनी लढलो– आमची शस्त्रे पाकिस्तानकडूनच आम्ही मिळविली होती–आणि आम्ही चांगली लढत दिली. आता आम्ही जे लढणार ते निकाली लढाई जिंकण्यासाठी लढणार. म्हणून आम्हाला योजनापूर्वक लढावे लागणार आहे. काळ आमच्या बाजूचा आहे आणि आम्ही जिंकू अशी आमची खात्री आहे.' ह्या उद्‌गारांवरून सरदार मेंगल यांच्या भूमिकेची कल्पना येईल.

'आपली भूमिका विघटनवादी नाही का? ' या प्रश्नाला सरदार मेंगल यांचे उत्तर असे आहे, की पाकिस्तान विघटन होण्याच्या अवस्थेत येऊन सापडला आहेच. सिंध आणि बलुचिस्तान यांना पंजाबचे भाग मानायला पाकिस्तानने जेव्हा सुरवात केली, तेव्हाच या विघटनाच्या प्रक्रियेला प्रारंभ झाला, असे त्यांचे मत आहे. पंजाबकडून होणारी पिळणूक थांबविण्याचा एकच मार्ग आहे. तो म्हणजे सिंध आणि बलुचिस्तान यांना पंजाबपासून वेगळे करणे.

भुत्तोंच्या राजवटीविषयी त्यांचे म्हणणे असे आहे की, "बेदरकार आणि निष्ठूर पंजाबी पुढाऱ्याने जे केले असते, तेच भुट्टो यांनीही केले. सत्तेवर आल्यावर भुट्टो यांना हे समजून चुकले, की पंजाब्यांच्या पाठिंब्याशिवाय आपला तरणोपाय नाही. तेव्हा अयूब यांच्या मार्गाने ते जाऊ लागले. बलुचिस्तानावर त्यांनी बाँबहल्ले सुरू केले, आमच्या लोकांचे प्राण घेतले, मालमत्ता नष्ट केली. आम्ही पंजाबी लोकांबरोबर जगू शकणार नाही. पण सिंधी लोकांबरोबर जगू शकू.

"सिंधी लोकांनी लोकशाही पुनःस्थापनेच्या आंदोलनाला जो पाठिंबा दिला आहे तो वास्तविक पंजाब्यांच्या वरचष्म्याविरुद्ध त्यांचा जो असंतोष खदखदतो आहे त्याचा उद्रेक आहे. मला तर पंजाब हा वेगळा देश वाटतो. माझ्या दृष्टीने ते पाकिस्तानचेच दुसरे नाव आहे.

"मला स्वत.ला हे आंदोलन अहिंसात्मक मार्गाने झाले असते तर समाधान वाटले असते. पण लोक करणार तरी काय ? सिंधी लोकांच्या न्याय्य आकांक्षा दडपून टाकून झिया त्यांना हिंसेला प्रवृत्त करीत आहेत. आज जर लष्करी हुकूमशाही संपुष्टात आली तर सिंधमध्ये असलेली आणीबाणीची परिस्थिती निवळेल असा पन्नास टक्के तरी विश्वास वाटतो.

"बलुची लोक आंदोलनात मोठ्या प्रमाणावर सामील झालेले नाहीत याचे कारण असे, की सिंधी लोक हे लोकशाहीच्या पुनःस्थापनेसाठी लढत आहेत असे त्यांना वाटते आणि त्यांना लोकशाहीत रस नाही. सिंधी लोक पंजाबपासून सुटका करून घेण्यासाठी लढत आहेत हे जेव्हा त्यांना कळेल, तेव्हा ते त्यांना साथ देतील. सिंधमध्ये जर स्फोट झाला तर बलुची निश्चितपणे त्यांना साथ देतील.

"बलुची लोकांचा पंजाबवर जो राग आहे त्याची काही कारणे आहेत. बलुचिस्तानात जे पोलिसदल आहे त्यात केवळ पाच टक्के बलुची

लोक आहत. फौजदारापलीकडले उच्च पद कोणाही बलुची व्यक्तीला मिळालेले नाही. सैन्यामध्ये कोणीही बलुची नाही. जेव्हा योग्य वेळ येईल, तेव्हा आम्ही उठाव करू आणि तो असा करू, की त्या लाटेपुढे पाकिस्तान आणि त्याचे पाठीराखे टिकाव धरू शकणार नाहीत.

" केवळ झियांची राजवट बदलून आमचे समाधान होणार नाही. आम्ही स्वतंत्र व स्वायत्त होऊ तेव्हाच आमचे समाधान होईल. जेव्हा अयूबखान सत्तेवर होते तेव्हा त्यांनी शेकडो बलुची मारले आणि जेव्हा भुट्टो सत्तेवर आले तेव्हा त्यांनी हजारो बलुची मारले. हे सगळे पंजाबी सैन्याधिकाऱ्यांनी मारले आहेत. जेव्हा भुट्टोंनी बलुचींवर गोळ्या झाडायला पंजाबी सैन्याला हुकूम केला, तेव्हा त्यांनी तो मानला; पण जेव्हा पंजाब्यांवर गोळ्या झाडायचा त्यांनी हुकूम केला, तेव्हा सैन्य उलटले. आम्ही सिंधी लोकांबरोबर आमची सोडवणूक करून घेऊ आणि आम्ही स्वतंत्र झाल्याबरोबर सरहद्द प्रांतही स्वतंत्र होईल. पंजाब्यांनी बलुचिस्तानमध्ये जे अत्याचार केले आहेत त्याची कल्पना तुम्हाला करता येणार नाही. एके काळी बलुचिस्तानमध्ये एक लक्ष पाकिस्तानी सैन्य होते यावरून आम्हाला वठणीवर आणण्यासाठी पाकिस्तानने केवढा खर्च केला असेल याची कल्पना तुम्ही करू शकता. त्यांचा दिवसाचा खर्च एक कोट रुपये एवढा होता. पैसा मुख्यतः इराणच्या शहाकडून येत होता. शहाने जो पैसा दिला तो आता खोमिनी परत मागत आहेत असे म्हटले जाते. झिया तो परत करीत आहेत असे म्हणतात—अन्नधान्याच्या स्वरूपात.

" भारत सिंधी लोकांना उघडपणे पाठिंबा देत आहे ही आमच्या दृष्टीने उत्तेजनकारक गोष्ट आहे. सर्व दडपलेल्यांच्या दृष्टीने इंदिरा गांधी ह्या एक आशेचा किरण ठरल्या आहेत."

* * *

लोकशाही पुनःस्थापना आंदोलनाच्या एक प्रमुख प्रवक्त्या बेनझीर भुट्टो यांच्या नावावर प्रसिद्ध झालेल्या पुस्तकात अणुशस्त्राविषयीच्या पाकिस्तानी धोरणाबद्दल पुढील विचार मांडलेला आढळतो. " ... अणुसंशोधनाचा कार्यक्रम पाकिस्तानात सुरू आहे ही गोष्ट सर्वांना माहीत आहे. तेव्हा ती नाकबूल करण्यात अर्थ नाही. हा कार्यक्रम माझ्या वडिलांनीच सुरू केला होता. ते पाकिस्तानचे लोकशाही पद्धतीने निवडलेले पंतप्रधान होते. पण आजच्या बदललेल्या परिस्थितीत या कार्यक्रमाचे पुनर्मूल्यांकन झाले पाहिजे.

काय बदलले आहे ? आजच्या बदललेल्या राजकीय आणि आर्थिक परिस्थितीत बाँब बनविणे पाकिस्तानला परवडणारे नाही... दुसरी गोष्ट अशी, की या कार्यक्रमाच्या द्वारे झिया आणि त्यांचे सेनापती यांनी भारताशी शस्त्रस्पर्धा सुरू केली असणे शक्य आहे. ... तीही आपल्याला परवडणारी नाही. भारताशी किंवा कोणत्याच देशाशी युद्ध करणे अयोग्य आहे ही जाणीव आपल्याला झाल्यानंतर भारताशी शस्त्रस्पर्धा करण्यात, विशेषतः अण्वस्त्रस्पर्धा करण्यात अर्थ नाही .... आणि चवथी गोष्ट अशी, की लोकशाही शासनाने जे करणे उचित ठरते ते, ज्यांना मित्र असत नाहीत अशा लष्करी हुकूमशहांनी करणे योग्य असतेच असे नाही."

यावरून बेनझीर भुट्टो ह्या मुरब्बी राजकारण्यासारखे बोलू शकतात हे स्पष्ट होईल.



## लेखकांना विनंती

साहित्य कागदाच्या एका बाजूला, सुवाच्य अक्षरात आणि
मराठी साहित्य महामंडळाच्या शुद्धलेखनाच्या नियमांनुसार असावे.
नापसंत साहित्य परत पाहिजे असल्यास
सोबत पुरेसे टपालहशील असणे आवश्यक आहे.







## वर्गणीदारांसाठी

ज्यांच्या अंकाच्या वेष्टनावर X खूण असेल, त्यांची वर्गणी संपलेली आहे.

ज्यांच्या अंकाच्या वेष्टणावर XO अशी खूण असेल त्यांची वर्गणी संपूनही एक अंक पाठवला आहे.

ज्यांच्या अंकाच्या वेष्टणावर XOO अशी खूण असेल त्यांची वर्गणी संपूनही दोन अंक पाठविले आहेत.

**कृपया आपली वर्गणी सत्वर पाठवावी व सहकार्य द्यावे. वर्गणी पाठविताना अंकाच्या वेष्टनावर असणारा वर्गणीदार क्रमांक अवश्य उल्लेखावा ही विनंती.**

अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास


नवभारत
७५
अमृतमहोत्सवी
वर्ष

Registered No. SAT – 29 and Licenced to post without pre-payment–Licence No. 6



हे मासिक श्री. ग. दीक्षित यांनी दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथे छापून मे. पुं. रेगे यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.

अनुक्रमणिका